

नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत




वर्ष १४ वें ]  ऑक्टोबर १९६०  [ अंक १



वार्षिक वर्गणी ९ रु ]  [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका






## प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (१) | धर्मकोश- व्यवहारकाण्ड | भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी ... | ... | ... | ५२-०-० |
| | कापडी बांधणी ... | ... | ... | ६४-०-० |
| (२) | धर्मकोश - उपनिषत्काण्ड | भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... | ... | ... | ११०-०-० |
| | कापडी बांधणी ... | ... | ... | १२६-०-० |
| (३) | धर्मकोश- संस्कारकाण्ड | भाग १ ला | .... | ४५-०-० |
| (४) | मीमांसादर्शन ... ... | ... | ... | ३०-०-० |
| (५) | मीमांसाकोश ... | भाग १ ते ४ | | १३५-०-० |
| (६) | कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | ... | ... | ६-०-० |
| (७) | हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) | | ... | ५-०-० |
| (८) | वैदिक संस्कृतीचा विकास ... | .. | ... | ६-०-० |
| (९) | नवमानवतावाद ... ... | ... | ... | २-८-० |
| (१०) | मानवाचा आदर्श ... ... | ... | ... | ३-०-० |
| (११) | चार्वाक- इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | | ... | ३-०-० |
| (१२) | गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) | | ... | २-८-० |
| (१३) | छत्रपति संभाजी महाराज ( श्री. वा. सी. बेंद्रे ) | | .... | १६-०-० |

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

वर्ष चौदावें | अंक पहिला

# नवभारत

आक्टोबर १९६०

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. वि. म. बेडेकर

प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, 'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )










अनुक्रमणिका

❊ मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

❊ या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

❊ मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

अनुक्रमणिका

# सार-संकलन

## भारतीय राजकारणांत —
## जातीय संघटनांचें स्थान

भारतीय राजकारणांत जातीय संघटनांना आज महत्त्वाचें स्थान आहे, हें निर्विवाद आहे. जातिनिष्ठा ही व्यापक लोकशाहीनिष्ठेला मारक आहे, याबद्दल मतभेद होण्याचें कारण नाहीं. परंतु जातीयतेवर परिणामकारक तोडगा शोधून काढण्याच्या दृष्टीनें जातीय संघटनांचें कार्य सर्वांगीणरित्या समजून घेणें आवश्यक आहे. **पॅसिफिक अफेअर्स** या त्रैमासिकाच्या वर्ष ३३, अंक १ यांत आलेला " भारतांतील जातीय संघटनांचें राजकीय कार्य " हा लेख या दृष्टीनें वाचकांना बोधप्रद वाटेल. या लेखाचे लेखक श्री. लॉइड आय. रुडॉल्फ आणि श्रीमती रुडॉल्फ हार्वर्ड विद्यापीठांत राज्यशास्त्राचे शिक्षक आहेत. गेलीं कांहीं वर्षें रुडॉल्फ दंपतीनें भारतांत राहून येथील राजकीय आणि सामाजिक संस्थांचा अभ्यास केला आहे. खालील मजकूर वर उल्लेखिलेल्या लेखांतून उद्धृत केला आहे.

" आधुनिक राजकीय संस्कृतीशी समरस झालेल्या शहरी सुशिक्षित लोकांना (राजकीय पक्ष, ट्रेड युनियन, इत्यादिसारख्या) स्वयंस्फूर्त प्रयत्न आणि तज्जन्य संघटना -( voluntary associations ) चें आकर्षण वाटत आहे. परंतु ग्रामीण विभागांतील जनता अजून परंपरागत संस्कृतीच्या जाळ्यांतून बाहेर पडलेली नाहीं; तसेंच राजकीयदृष्ट्या ती अजून अज्ञान आहे. अशा या जनतेला जातिसंस्था नेतृत्व पुरवून लोकशाहीच्या राजकारणांत भाग घेण्यास मदत करते. जातिसंस्थेचें हें कार्य जातीय संघटना- ( Caste associations ) मार्फत होत असतें. हा संघटनाप्रकार गेल्या चाळीसपन्नास वर्षांत देशांत सर्वत्र प्रसार पावला आहे. अशा संघटना कांहीं काळापर्यंत तरी भारतीय राजकारणाचें एक महत्त्वाचें वैशिष्ट्य म्हणून राहतील हें स्वातंत्र्यानंतर अधिकाधिक स्पष्ट झालें आहे.

" जातीय संघटना जेव्हां सरकारकडे मदत मागूं लागल्या तेव्हां सुरुवातीस त्यांच्या मागण्या जातिबद्ध समाजांत आपल्या जातीला सामाजिक दृष्ट्या वरचें स्थान मिळावें या स्वरूपाच्या होत्या. परंतु उदारमतवादी आणि लोकशाही विचारांचें समाजाच्या विशालतर थरांत अभिसरण होऊं लागल्यावर जातीय संघटनांचीं उद्दिष्टेंहि त्यानुसार बदलूं लागलीं. मंदिरप्रवेशाची आणि सेन्सस्‌मध्यें मानाचें नांव घालण्याची मागणी करण्याऐवजी जातीय संघटना प्रशासकीय यंत्रणेंत आणि शैक्षणिक संस्थांत जागा, आणि राजकीय प्रतिनिधित्व यांची मागणी करूं लागल्या. राष्ट्रीय स्वातंत्र्य आणि राजकीय लोकशाही मिळाल्यानंतर या नवीन मागण्यांना जोर आला. निवडणुकीनें भरावयाच्या जागांसाठी आपल्या सदस्यांना उभें करण्याकरितां; राज्यसरकारांच्या मंत्रीमंडळांत आणि इतर सत्तास्थानांवर त्यांना घ्यायला लावण्याकरितां; आणि मंत्रीपद, विधानसभासदस्यत्व, व प्रशासकीय यंत्रणा यांचा आपल्या जातीचें शैक्षणिक, आर्थिक आणि इतर क्षेत्रांत कल्याण करून घेण्याकरितां जातीय संघटना असलेल्या राजकीय पक्षांच्या मार्फत किंवा नवीन पक्ष स्थापून प्रयत्न करूं लागल्या आहेत. परंतु आधुनिक काळांत या संघटनांचें सर्वांत महत्त्वाचें कार्य म्हणजे राजकीय दृष्ट्या अशिक्षित असलेल्या मतदार समूहाला संघटित करून त्याच्या आकांक्षांना मूर्त स्वरूप देण्यांत आणि त्याला लोकशाहीच्या कार्यपद्धतीचें









आणि मूल्यांचें शिक्षण देण्यांत त्यांनीं दाखविलेलें सामर्थ्य हें होय.

" जातीय संघटनाचें नेतृत्व, पूर्वी जातीच्या नेतृत्वाप्रमाणें, आतां वंशपरंपरेनें कांही विशिष्ट घराण्यांत रहात नाहीं. या संघटनाकरितां लागणाऱ्या नेतृत्वाची "उपलब्धता" तिचीं उद्दिष्टें व्यक्त करण्यास लागणाऱ्या गुणांवर अवलंबून असते. आणि याकरितां नवीन लोकशाही राजकारणाच्या कार्य पद्धतीची माहिती असलेले नेते लागतात. शैक्षणिक आणि व्यावसायिक पार्श्वभूमीमधून ही कला ज्यांना अवगत होते अशीं माणसें आतां नेतृत्वाच्या स्थानावर आलीं आहेत. या नव्या नेत्यांची आपल्या अनुयायांशी असलेली भूमिका पूर्वीच्या नेत्यांपेक्षा अधिक जबाबदारीची आहे; संघटनेच्या मागण्या व्यक्त करून त्या मिळवून देण्याच्या शक्तीवर त्यांचें स्थान अवलंबून असतें.

" लोकांना चिरपरिचित आणि ( म्हणून ) मान्य असलेल्या संस्थांच्या मार्गानें जातीय संघटना भारताच्या खेडोंपाडीं राजकीय लोकशाही नेत आहे. या प्रक्रियेंत ती जातीचा अर्थहि बदलून टाकीत आहे. जातीचें महत्त्व कर्मकाण्ड व सामाजिक स्थान यापेक्षां तिच्या संख्याबलावर अवलंबून राहील अशी परिस्थिति निर्माण करून, आणि तिच्या सदस्यांच्या मनांतल्या समतेच्या आकांक्षेला प्रोत्साहन देऊन जातीय संघटना मुक्तिदायक स्वरूपाचा प्रभाव पाडीत आहेत.

" अठराव्या शतकांतल्या युरोपांत घडलें तसेंच भारतांत जुनी समाजव्यवस्था आणि परंपरा यांवर एक आघात आधुनिक मध्यमवर्गाकडून झाला. या वर्गाला नवीन राज्यघटनेंत अठराव्या शतकाच्या उदारमतवादी मूल्यांना अंतर्भूत करण्यांत यश आलें. जुन्या व्यवस्थेला दुसरें आव्हान जातीय संघटनाकडून आलें आहे, आणि हें आव्हान अधिक मूलगामी व त्यांत सामावलेल्या मागण्या आणि त्यामुळें जातीय संघटनेनें मिळविलेलें विविधप्रकारचें स्वातंत्र्य अधिक एतद्जन्य आहे.

" जातीय संघटनेनें जुन्या समाजव्यवस्थेला अशा कितीतरी ठिकाणीं आव्हान दिलें आहे कीं ज्याबाबतींत आधुनिक " उदारमतवादी " मध्यमवर्गाला फार थोडा रस वाटत होता. भारतीय विचारवंतांनीं केलेल्या विश्लेषणांत या घटनांचें श्रेय त्यांच्याकरितां झटणाऱ्या संघटनांपेक्षां शासनसंस्थेला दिलेलें आढळतें. या दृष्टिकोनांत जुन्या समाजव्यवस्थेंत अजून असलेल्या मुक्तिदायक शक्तींचें अवमूल्यन होत आहे. जातीय संघटनांकडून होत असणाऱ्या मुक्तिदायक कार्याकडे दुर्लक्ष होण्याचें एक कारण असें दिसतें कीं आधुनिक भारतीय मध्यमवर्ग ( कोठल्याहि स्वरूपांतल्या ) जातिसंस्थेकडे आपण ज्याचा नाश करण्याची आशा बाळगत आहो त्या जुन्या समाजव्यवस्थेचा भाग म्हणून पहात आहे. जुन्या संस्थेंचीं वस्त्रें परिधान करून एक नवीन सामाजिक आणि राजकीय शक्ति (जुन्या समाजव्यवस्थेचें निर्मूलन करूं पाहणाऱ्या ) या प्रक्रियेंत थोडेसें सहकार्य देत आहे, जाति एका अर्थानें येथें जातिव्यवस्थेच्या विरुद्ध जात आहे, हें त्याला समजण्यापलीकडे वाटत आहे. जातीय संघटना आपापल्या अनुयायांच्या हितांकरितां प्रयत्न करीत आहेत म्हणून त्यांना स्वार्थी आणि संकुचित हितांच्या मागें लागलेल्या समजून, समाजहित आणि सामाजिक शिस्त यांच्या नांवाखाली त्यांचा धिक्कार केला जात आहे. तसेंच आदर्श समाज याच्या स्वप्नाळू कल्पनांच्या आधारावर धोरण ठरविणारे योजक ( planners ), सनदी नोकर आणि विचारप्रणालीपंडित– ( ideologues ) हि जातीय संघटनेला इतर स्वयंस्फूर्त किंवा सहजप्रवृत्तींतून निर्माण झालेल्या संघटना ( उदा. उद्योगपतींची संघटना, कामगार संघटना, राजकीय पक्ष, इत्यादि ) यांच्यासारखी समजून तिचा धिक्कार करीत आहेत. जातीय



अनुक्रमणिका







संघटनेचीं उद्दिष्टें अशा लोकांना स्वकेंद्रित, गोंधळ माजवणारी आणि संकुचित वाटतात. समाजहित म्हणजे अनेक गटांच्या उद्दिष्टांचा परस्पर संघर्ष आणि समन्वय यांमधून ठरलें पाहिजे, हें त्यांना नैतिकदृष्ट्या अधोगतीस नेणारें, बौद्धिक दृष्ट्या असमाधानकारक आणि सौंदर्यदृष्ट्या अप्रिय वाटत आहे. त्यांच्या दृष्टीनें राजकीय समाज ( political community ) म्हणजे एका टोकास शासनसंस्था आणि दुसऱ्या टोकास नागरिक, आणि समाजहिताचें स्वरूपीकरण (formulation) आणि त्याचें कृतींत आविष्करण हें एक ह्या शासन संस्थेचें–किमान प्रामुख्यानें तिचेंच–कार्य आहे असें दिसतें. स्वयंस्फूर्त आणि सहजप्रवृत्त ( Voluntary and natural ) संघटना स्वातंत्र्योपभोगाचें माध्यम आहेत, आणि शासनसंस्थेहून स्वतंत्र किंवा तिनें ठरविलेल्या उद्दिष्टांना पूरक अशीं उद्दिष्टें साध्य करण्याचा प्रयत्न करून अशा संघटना व्यक्ति-स्वातंत्र्य आणि समूहस्वातंत्र्य सुरक्षित ठेवण्याच्या कार्यात महत्त्वाची मदत करीत आहेत, हें त्यांना समजत नाहीं.

"वर सांगितलेल्या कोठल्याहि गोष्टीचा असा अर्थ होत नाही कीं जातीय संघटना भारतीय राज-कारणाच्या केवळ जमाबाजूची बाब आहे. गटनिष्ठेला गुण आणि कार्यक्षमता यांच्यावर आणि जातिनिष्ठेला समाजहिताच्यावर स्थान देण्याची जातीय संघटनेची प्रवृत्ति उदारमतवादी आणि लोकशाही मूल्यांस बाधक आहे, आणि सरकारच्या महत्त्वाच्या कार्यांची परिणाम-कारकता धोक्यांत आणीत आहे. सरतेशेवटीं, राज-कारणांत जातीय संघटनेचा खरा अर्थ अनिश्चित आहे; ( परंतु ) आतांपर्यंत तिच्या स्थानाबद्दल बराच गैरसमज झालेला आहे आणि तिच्या विधा-यक कार्याकडे दुर्लक्ष झालें आहे."

### आफ्रिकेंत धोक्याचीं चिन्हें:–

इ. स. १९५० आणि इ. स. १९६० या दोन वर्षीचें आफ्रिका खंडाचे नकाशे पाहिल्यावर मनावर ठसणारी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे गेल्या दहा वर्षांत या सुप्त व अज्ञानावस्थेंत असलेल्या खंडांतल्या देशांनीं स्वातंत्र्याकडे केलेली वाटचाल ही होय. कायरो ते केप कामोरिनपर्यंतच्या विशाल भूप्रदेशांत वास्तव्य करणाऱ्या विविध तद्देशीय लोकांची आधुनिक राष्ट्रांत परिवर्तनाची प्रक्रिया संपूर्ण शांततामयरीत्या होणें हें केव्हांहि शक्य नाहीं. परंतु जेथें राजकर्ता वंश किंवा राष्ट्र उदारमतवादी परंपरेंत वाढलेलें असतें तेथें हिंसा आणि तज्जन्य द्वेष यांचें प्रमाण शक्य तेवढें कमी ठेवून देशी प्रजांना स्वातंत्र्याकडे जातां येतें; अन्यथा गुलाम देशांना हिंसेच्या अतिरेकाशिवाय स्वातंत्र्याची आशा बाळगणें कठीण असतें. द्वितीय विश्वयुद्धानंतरच्या काळांतील एकीकडे फिलिपिन्स, भारत, बर्मा, सिलोन, इंडोनिशिया इत्यादि राष्ट्रें आणि दुसरीकडे गोवा, इंडोचायना, पोलंड, पूर्व-जर्मनी, हंगेरी, तिबेट इत्यादि राष्ट्रें यांचा अनुभव या दृष्टीनें सूचक आहे. आफ्रिकाखंडांतहि आज असाच प्रत्यय येत आहे. उत्तर आणि मध्य आफ्रिकेंतलीं बरी-चशीं राष्ट्रें आज स्वतंत्र झालीं आहेत किंवा लवकरच स्वतंत्र होण्याचा संभव दिसत आहे. या उलट दक्षिण ऱ्होडेशिया आणि दक्षिण आफ्रिकेंतील लोकांना स्वराज्य मिळविण्याकरितां अजून लढा द्यावा लागेल असें दिसत आहे. दुर्दैवानें त्यांच्या लढ्यांत जागतिक शीतयुद्धाचा शिरकाव होण्याचीं चिन्हें अजिबात नाहींत असें म्हणतां येत नाहीं. यामुळें गेल्या कांहीं वर्षांत आफ्रिकेंतील परिस्थिति केवळ अफ्रिकेकरि-तांच नव्हे तर सर्व जगाकरितां स्फोटक ठरण्याचा संभव आहे. लंडनच्या 'इकॉनॉमिस्ट' या साप्ता-हिकाच्या जुलै ३० च्या अंकांतून घेतलेला खालील मजकूर या दृष्टीनें विचार करावयास लावणारा आहे.








" जुलै ७ च्या कांगोतील बंडानंतर आफ्रिकेंत आतां कांहींहि पूर्ववत् राहणें अशक्य आहे. ज्या स्वतंत्र आफ्रिकन राष्ट्रांनीं आतांपर्यंत संयुक्त राष्ट्रसंघाच्या कांगोतील मध्यस्थीला ( intervention ) टिकाव दिला आहे. तीं राष्ट्रें आतां लिओपोल्ड व्हिल आणि कटांगा दोन्हीमधून– बेल्जियन, अमेरिकन किंवा रशियन–सर्व प्रकारचें राजकीय पालकत्व टाळण्याचा प्रयत्न करण्यांत गुंतलेलीं आहेत. या आफ्रिकन धोरणाला पाठिंबा देऊन युनायटेड स्टेट्सनें न्यूयॉर्क ( संयुक्त राष्ट्रसंघ ) मध्यें नुकतेंच मोठें राजनैतिक यश संपादन केलें आहे. आतां दक्षिण ऱ्होडेशियांतील असंतोषामुळें आफ्रिकन राष्ट्रांचें लक्ष त्या दिशेकडे वळत आहे. तिकडची परिस्थिति जर अशीच चिघळत राहिली तर ज्या राजकीय शक्तींनीं कांगोच्या बाबतींत उपक्रम दाखविला त्या शक्ती सॅलिसबरीच्या द्वारावर येऊन ठेपतील. (सॅलिसबरी-दक्षिण ऱ्होडेशियाची राजधानी) "अजून ऱ्होडेशियांतील परिस्थिती आणीबाणीची झालेली नाहीं, पण ती तशी होण्याची शक्यता आहे. कदाचित् असेंहि होईल कीं, कांगोत गुंतून पडल्यामुळें ( अनेक ) राष्ट्रांना इतर ठिकाणीं लेढ वाढविण्यास सवड मिळणार नाहीं. सुरक्षा समितींत जुलै २२ ला झालेल्या चर्चेंतून असेंहि निष्पन्न होण्याची शक्यता आहे कीं मनरोसिद्धांता ( Monroe doctrine ) सारखा एकादा सिद्धांत आफ्रिका खंडाकरितां पुढें येईल. असें झालेंतर बड्या राष्ट्रांकडून आफ्रिकेंत हस्तक्षेप होणार नाहीं याची दक्षता घेतली जाईल. आज ( हस्तक्षेप टाळण्यांत ) आलेलें यश टिकाऊ आहे असें नाहीं; आणि हें यशसुद्धां युनायटेड स्टेट्सनें दाखविलेला संयम, आफ्रिकन राष्ट्रांनीं घेतलेली स्वतंत्र भूमिका, आणि या दोन गोष्टींपुढें सोविएट युनियननें आयत्या वेळीं घेतलेली माघार–यांच्यामुळें मिळालेलें आहे. परंतु गेल्या आठवड्यांत अशी एक वेळ आली होती कीं, जेव्हां संयुक्त राष्ट्रसंघानें दाखविलेल्या उपक्रमशीलतेवर होणारी रशियन टीका मर्यादेच्या पलीकडे जात होती. उदाहरणार्थ, क्रुश्चेवचा जांवई संपादक झाल्यानंतर इझ्वेस्टिया अधिक लक्षपूर्वक वाचलें जात आहे; असें असूनहि या पत्रांत श्री. हॅमरशील्ड आणि डॉ. बंच यांच्यावर वैयक्तिकस्वरूपाचे टीकाप्रहार केले जात होते. मॉस्कोरेडिओवरील खालील विधान जुलै २१ च्या अंकांत उद्धृत केलें होतें : " नवीन आफ्रिकन राष्ट्रांच्या स्वातंत्र्याला गळफास लावणारें धोरण अवलंबितांना बंचला स्वतःच्या काळ्या रंगामुळें अवघडल्यासारखें वाटत नाहीं. " *

( हें कांहींहि असलें तरी ) " भविष्यकाळांत संयुक्त राष्ट्रसंघाला हस्तक्षेप करावा लागला तरी आतां तो अगदीं नवीन वाटणार नाहीं. परंतु जेथें खऱ्या अर्थानें शासनसंस्थेची हुकमत चालत नाहीं अशा परिस्थितींत हस्तक्षेप करणें एक वेगळीच गोष्ट आहे, आणि जिथें सुसंस्थापित सरकार अस्तित्वांत आहे– मग तें लिस्बन, प्रिटोरिया किंवा सॅलेसबरी कोठेंहि असो– आणि तें सरकार अशा प्रकारची दखल आपल्या स्वतःच्या पद्धतीनें घेण्यास कृतनिश्चयी आहे, तेथें संयुक्तराष्ट्रसंघाचा हस्तक्षेप ही वेगळीच गोष्ट आहे. येत्या काळांत " काळे " आफ्रिका राष्ट्रसंघाची मदत मागेल ती लिओपोल्ड व्हिल सारख्या कायदेशीर सरकारला टिकवून धरण्याकरितां नव्हेतर कायदेशीररित्या स्थापित झालेल्या सरकारच्या विरुद्ध असेल. परंतु आफ्रिकेच्या मध्यभागांत संयुक्तराष्ट्रसंघाची हजेरी आहे, केवळ एवढी गोष्टहि भविष्यकाळांत महत्त्वाची ठरण्याचा संभव आहे. "

* डॉ. बंच नीग्रो आहेत.











अनुक्रमणिका

**आफ्रिकन व्यक्तिमत्त्व :**

न्यू स्टेट्समन अँड नेशन या ब्रिटिश साप्ताहि-काच्या जुलै १८ च्या अंकांत "आफ्रिका १९६०" या लेखमालेचा दुसरा हप्ता, "राजकीय परिवर्तन" या शीर्षकाखालीं प्रसिद्ध झाला आहे. नवोदित आफ्रिकन राष्ट्राचें व्यक्तिमत्त्व कसें आहे याचें खालील वर्णन या लेखांतून घेतलें आहे.

"आंतरराष्ट्रीय जीवनांत 'आफ्रिकन व्यक्तिमत्त्वांची एक विशिष्ट कल्पना निर्माण करण्यास आफ्रिकन नागरिक कृतनिश्चय आहे. आज या कल्पनेचें स्वरूप त्याला अंधुकपणें दिसत आहे. तें स्पष्ट होण्यापूर्वी साम्राज्यवादानें क्षीण केलेला त्याचा आत्मविश्वास, त्याचा स्वाभिमान, आणि प्रतिष्ठा त्यानें परत मिळ-विण्याची गरज आहे. परंतु क्वामे एन्क्रूमा आणि सेकू तूरे यांच्यासारख्या नेत्यांच्या आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतल्या कामगिरीकडे सर्व आफ्रिकन लोक अभिमानानें पाहात आहेत. बिगर आफ्रिकनांच्या ढवळाढवळीला प्रतिकार करणारा म्हणून नासरलाहि आफ्रिकन लोक आफ्रिकेचा एक प्रतिनिधी म्हणून समजत आहेत......आपल्या प्रतिनिधींनीं बिगर आफ्रिकन जगाच्या कलहापेक्षां कांहींतरी खरेंखुरें आफ्रिकन असेल असें करावें अशी त्यांची अपेक्षा आहे.

नवीन स्वतंत्र झालेल्या आफ्रिकन राष्ट्रांच्या पर-स्परविरोधी महत्वाकांक्षा या प्रयत्नांना कमजोर करीत आहेत. पश्चिम आफ्रिकेंत नेतृत्वाकरितां स्पर्धा सुरू सुद्धां झाली आहे. वसाहतींपैकीं स्वतंत्र होणारें आणि आंतरराष्ट्रीय सभामध्यें इतरांच्या बरोबरीनें आपली जागा घेणारें पहिलें आफ्रिकन राष्ट्र म्हणून घानाला अगोदरच थोडा पुढाकार मिळालेला आहे. म्हणून खराखुरा आफ्रिकन आवाज म्हणून गिनीसह त्याला प्रथम मान्यता मिळाली. या सुरवातीच्या फायद्याला भक्कम पाया देण्याकरितां घानियन लोक निश्चयानें प्रयत्न करीत आहेत, परंतु ते आतां थोडेसे एकटे पडूं लागले आहेत. घाना गिनी नेतृत्वाला बराच विरोध होत आहे अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. मालीचा सेंघोर, ऑलिंपीओ आणि आयव्हरी कोस्टचा फ्रान्सला अनुकूल नेता हुफूएत्बान्यी आणि नायजिरीअन नेते — हे सर्व लोक एन्क्रूमा आणि सेकू तूरे यांच्या नेतृत्वाला विरोध करण्यांत एकमत आहेत. ऑक्टोबरमध्यें नायजिरीआ स्वतंत्र झाल्यानंतर हा सत्तेचा खेळ अधिक तीव्र होईल.

टयुनेशिया आणि यू. ए. आर. (इजिप्त-सीरिया) हे एक दुसऱ्याशी राजनैतिक संबंध ठेवूं इच्छित नाहींत, आणि इथिओपिया आपल्या सरहद्दीवर असलेल्या सोमाली प्रजासत्ताकाच्या विकासाकडे संशयवृत्तीनें पहात आहे. न्यासालंड आणि उत्तर ऱ्होडेशिया यांच्या कांहीं नेत्यांचे संबंध फार चांगले नाहींत, पूर्वीचे बेल्जीयन कांगो इतर आफ्रिकन राष्ट्रं यांचे परस्परसंबंध कसे राहतील हें अजून ठरलें नाहीं. तसेंच केनिया आणि टांगानिका यांच्या सरहद्दीपलीकडे मसाई लोकांच्यामध्यें जमातीच्या पातळीवरून संघटना करण्याचे प्रयत्न होऊं लागले आहेत. यामुळें या दोन्ही राष्ट्रांच्या विकासाला धोका निर्माण होण्याचा संभव आहे.

परंतु, हे सर्व आंतरिक संघर्ष असूनहि त्याचा परिणाम महत्वाचे मतभेद निर्माण होण्यांत झालेला नाहीं हें लक्षांत भरण्यासारखें आहे. वस्तुस्थिती अशी आहे कीं, आज राष्ट्रीय पातळीवरच्या स्पर्धे-पेक्षां पॅन–आफ्रिकनिझमची भावना बलवत्तर आहे. या भावनेची सर्वांत मोठी कसोटी कांगोचें ऐक्य टिकवून ठेवण्याच्या प्रयत्नांत लागणार आहे. एकदां वसाहतवाद गेला कीं मग युरोपियन साम्राज्यवादानें आंखलेल्या सीमारेषा पुसल्याहि जातील, नवीन संघटनाप्रकार निर्माण होतील, नवीन नेते पुढें येतील आणि सत्तेची आजची समतोलता बऱ्याच अंशीं बदलून जाईल. आज मात्र क्वामे एन्क्रूमा पुरस्कार








करीत असलेल्या 'संयुक्त आफ्रिकन संस्थान' (युनायटेड स्टेट्स् ऑफ आफ्रिका) याच्या मागणींत प्रतिबिंबित झालेल्या पेन-आफ्रिकनिझमची भावना सर्वप्रभावी आहे. जमातीय स्पर्धा आणि भाषिक परंपरा यांच्या जाणीवेंत रुतून पडण्याचें आफ्रिकन लोक टाळूं शकले तर इतर कोठेंहि आतापर्यंत न दिसलेल्या सबंध खंडाच्या पातळीवरच्या ऐक्याचें उदाहरण जगाला घालून देतील. हें कसें शक्य होईल, त्याकरितां शासनसंस्थेचीं कोठलीं स्वरूपें लागतील, आफ्रिकेच्या तेवीस कोटी लोकांच्या जीवनावर त्याचा काय परिणाम होईल-या सगळ्या गोष्टी आज केवळ कल्पनाविलासाचे विषय आहेत. एक गोष्ट निश्चित आहे, आणि ती म्हणजे : आफ्रिकेचें ऐक्य सबंध उर्वरित जगावर फार महत्त्वाचा परिणाम करील."

## वाळवंटाचें नंदनवन

विज्ञान आणि तंत्रविद्या यांचा उपयोग विधायक कार्यासाठीं केल्यास काय होऊं शकतें याचा प्रत्यय इझरेलनें गेल्या कांहीं वर्षांत दिला आहे. आपल्या देशांत होणाऱ्या राजस्थान कॅनॉलसारखी पाणी-पुरवठ्याची व्यवस्था करून इझरेलनें वाळवंटाचें नंदनवन केल्याचें खालील वर्णन मँचेस्टर गार्डियनच्या जुलै २८ च्या अंकांतून घेतलें आहे.

" नेगेव्ह हें बीरशेबाच्या वायव्येस गाझा पासून अकाबच्या उपसागरापर्यंत पसरलें आहे. त्याचा बराच भाग पर्वतमय आणि तीन चतुर्थांश विस्तारांत वार्षिक पाऊस चार इंचापेक्षां कमी आहे. दहा वर्षांपूर्वी नेगेव ओसाड होतें; मातीच्या झोपड्या असलेलें बीरशेबा एवढें एक त्याचें लोकवस्ती असलेलें केंद्र होतें. आज बीरशेबा एका प्रांताची राजधानी आहे. आणि घरें, कारखाने, समकालीन प्रकारची सार्वजनिक इमारती यांची सुरत नवी, आधुनिक दिसत आहे. बीरशेबाची लोकसंख्याहि आतां चाळीस हजाराच्या घरांत आहे.

नेगेवच्या उत्तरेस हजारों एकर जमीन सुधारून मनुष्याच्या उपयोगाकरितां योग्य स्वरुपांत आणली गेली आहे. या जमिनीचा असा आमूलाग्र कायापालट झाला आहे कीं त्याची शेती ही किनाऱ्यावरील असलेली सुपीक, सपाट जमीन आणि उत्तरेकडील खोऱ्यांइतकी जुनी नाहीं असें वाटणें अशक्यच आहे. पाण्याचा भरपूर पुरवठा करणाऱ्या पाइपलाइनी घातल्यामुळें पूर्वीचीं भाजून काढलेलीं मैदानें आणि वाळूच्या टेकड्या या आतां सुपीक शेतजमिनी झाल्या आहेत. या विभागांत नवीन शहरें अस्तित्वांत आलीं आहेत, त्यांचीं घरें सुबक, दुमजली आहेत. आणि जवळच नवीन वसाहत केलेल्या हजारों लोकांना रोजगार देणारे आकर्षक म्हणतां येतील असे चांगले हवेशीर कारखाने आहेत.

इ. स. १९४८ मध्यें इझरेली लष्करानें बीरशेबाबरोबर आयलट या किनाऱ्यावरील शहरांत इ. स. १९५८ मध्यें या दोन शहरांना जोडणारा रस्ता सुरूं झाल्यापासून आयलट शहराचा विकास वेगानें होऊं लागला आहे. इ. स. १९५६ च्या सिनाइच्या युद्धानंतर आयलटचा कसोशीनें विकास करण्याचे प्रयत्न सुरूं झाले. कारण या बंदरामुळें इझरेलला सुवेझ कालव्यावर अवलंबून राहिल्याशिवाय ॲटलांटिक आणि हिंदी महासागरांत प्रवेश मिळाला आहे. भूमध्य समुद्रावर असलेल्या दुसऱ्या कुठल्याहि देशाला अशी सोय नाहीं. आयलटची लोकसंख्या १९५६ मध्यें ८५० होती; ती एका वर्षांत २५०० झाली आणि आतां ती ७००० आहे.

नेगेव विभागाच्या विकासांत महत्त्वाचा घटक पैसा नसून पाणी आहे. आयलटचा वार्षिक पाऊस एक इंच आहे आणि तीस मैलावर असलेल्या झऱ्यातून नुकतीच एक पाइपलाइन तयार होण्यापूर्वी या शहरास पाणीपुरवठाच नव्हता. उत्तर








आणि मध्य इस्रेलमध्यें मानवनिर्मित पाणीपुरवठ्यामुळें चार ते सहापट वाढ होणें एवढाच फरक पडतो; परंतु नेगेव प्रदेशांत अशा पाणी पुरवठ्यामुळें अजिबात पीक नसणें आणि वर्षांत दोन भरघोस पिकें येणें असा फरक पडला आहे.

सिनाईच्या युद्धाच्या वेळीं आयलटपासून हाइफापर्यंत कांहीं महिन्याच्या काळांत दोनशें मैल लांब अशी एक आठ इंची पाइपलाइन घालण्यांत आली. या पाइपलाइननें सुवेझ कालव्यावर अवलंबून न राहतां दहा लक्ष टन तेल दरवर्षी नेतां येतें. पुढल्यावर्षापर्यंत या पाइपलाइनचें स्थान बत्तीस इंच पाइपलाइन घेईल, आणि अशी अपेक्षां केली जाते कीं हाइफ्याहून इराणी उपसागराच्या प्रदेशाचें तेल युरोपांत निर्यात केलें जाईल; आतांची लहान पाइपलाइन दक्षिणेस पाणीपुरवठ्याकरितां वापरली जाईल.

तेल अव्हिवमध्यें उगीच नाहीं सांगत कीं, " नेगेव नाहीं पाहिलें तर इस्रेल पाहिलेंच नाहीं.

## रॉयल सोसायटीच्या तृतीय – शतसंवत्सरीच्या निमित्तानें

संशोधकाला रॉयल सोसायटीचें सदस्यत्व मिळविणें म्हणजे त्याला सर्वांत मोठा मान मिळाल्यासारखें आहे. जगाच्या विद्वत्संस्थांपैकीं रॉयल सोसायटी ही एक सर्वांत जुनी असून आतांपर्यंतच्या तीन शतकांत तिनें अव्याहत कार्य केलें आहे. ऐतिहासिक परिस्थित्यनुसार तिचा प्रभाव कमीजास्त झाला आहे, परंतु नेपोलिऑनिक युद्धांसारख्या आणीबाणीच्या काळांतहि तिचे सदस्य आपलें संशोधन चालू ठेवूं शकले आहेत आणि सर्व देशांच्या वैज्ञानिकांशीं पत्रव्यवहार किंवा वैयक्तिक गांठीभेटीद्वारां संबंध ठेवूं शकले आहेत. ही सोयायटी इ. स. १६६० सालीं स्थापन झाली. आणि चालू वर्षी तिची तृतीयशतसंवत्सरी साजरी केली जात आहे. हा समारंभ जुलै १९ ला लंडनच्या आल्बर्ट हॉलमध्यें सोसायटीचे अध्यक्ष सर सिरिल हिंशेलवुड यांच्या अध्यक्षीय भाषणानें सुरू झाला. अशा सोसायट्यांच्या उपयुक्ततेबद्दल खालील मजकूर सर सिरिल यांच्या भाषणांतून घेतला आहे.

" वैज्ञानिक संशोधनास आर्थिक साहाय्य लागतें, आणि ज्ञानाचा जसजसा विकास होत जातो तसतसें या साहाय्याचें प्रमाण अधिकाधिक वाढत जातें. कांहीं अपवाद सोडले तर अशा परिस्थितींत स्वतःच्या जोरावर कांहीं करून दाखविण्याची व्यक्तीची शक्ति त्या मानानें कमी होत जाते. परंतु एक सामाजिक राजकीय संघटना म्हणून सन्नंध समाज अशा व्यक्तीला मदत देण्याची गरज समजूं शकेल अशी अपेक्षाहि करतां येत नाहीं. त्याचबरोबर मानवी भवितव्याकरितां विज्ञानाचें आज असलेलें महत्त्व लक्षांत घेतां समाज उदासीनहि राहूं शकत नाहीं. म्हणून व्यक्ति आणि समष्टि यांच्यामध्यें मध्यस्थी करूं शकणारी एक लहानशी विशिष्ट प्रकारची संघटना आवश्यक आहे. या संघटनेच्या सभासदांची संख्या तिच्याबद्दल विश्वास आणि मानाची भावना निर्माण होण्याइतकी मोठी पाहिजे, परंतु इतर गोष्टींपेक्षां ज्ञानान्वेषणास प्राधान्य देणाऱ्यानांच तिचें सभासदत्व मिळावयास पाहिजे.

सरकारी यंत्रणा अशा कार्याकरितां योग्य होणार नाहीं कारण कीं त्यांचें धोरण बदलत्या तात्कालिक गरजांना अनुरूप असावें लागतें. विद्यापीठेंहि हें कार्य करूं शकणार नाहींत. कारण त्यांना याबाबतींत दोन मोठ्या अडचणी आहेत. एकतर ज्ञानाची कोठलीहि शाखा विद्यापीठांत अनेक लहानलहान शाखेंत विभागली जाते; आणि दुसरें असें कीं ज्ञानान्वेषणाइतकेच महत्वाचे दुसरे अनेक व्याप त्यांच्या पाठीमागें असतात.

म्हणून संशोधनाची निष्पत्ति प्रसिद्ध करणारी धंदेवाईक दृष्टि न ठेवतां चालविलीं जाणारीं नियतकालिकें लगेच फायदा न देऊं शकणाऱ्या परंतु महत्त्वाच्या वाटणाऱ्या कल्पनांचा विकास सुरवातीच्या










अनुक्रमणिका

काळांत शक्य होण्यास लागणारें आर्थिक साहाय्य, परस्पर संपर्क आणि चर्चा यांतून मिळणारी चेतना ( stimulation ), आणि बौद्धिक यश संपादन केल्याबद्दल मिळणारा परंतु पैशाच्या रूपानें मोजतां न येणारा मानाचा पुरस्कार या महत्त्वाच्या गोष्टी उपलब्ध करून देण्याकरितां अॅकॅडमी ( Academy ) ही संस्था सर्वश्रेष्ठ ठरते. सरकार आश्रयदाता म्हणून राहूं शकतें, ती विद्वानाचा सल्ला आणि मदत घेऊं शकते. स्वतःला योग्य वाटणाऱ्या उपक्रमांना मदत आणि प्रोत्साहन देऊं शकते. आपल्या तोडीच्या माणसांनीं दाखविलेला आदर, त्यांनीं केलेली आपल्या कामाची कदर – यामधून वैज्ञानिकांना मिळणारें प्रोत्साहन सरकार कधींहि देऊं शकणार नाहीं. अशा अॅकॅडमीनें जर निःपक्षपाती आणि उच्च दर्जा कायम ठेवला तर सबंध वैज्ञानिक समाजांत आणि इतरत्रहि तिचा प्रभाव पडतो. सरकारी यंत्रणा अगर औद्योगिक संघटनांशीं ती स्पर्धा करीत नाहीं; उलट त्यांच्या नेत्यांना आपले सदस्य करून घेऊन ती अशा संघटनांशीं निकटचे संबंध ठेवते. कृतीच्या आणि सत्तेच्या क्षेत्रांत वावरत असलेल्या व्यक्तींनाहि निवडलें जाणें मानाचें वाटत असल्यामुळें विद्वद्जगाच्या मर्यादित वर्तुळापलिकडेहि अॅकेडमीचा प्रभाव पडत असतो. वैज्ञानिक लोक सरकार आणि उद्योग या क्षेत्राच्या गरजा समजून घेऊं शकतात, आणि त्याबरोबरच या क्षेत्रांतहि वैज्ञानिक विचारांचा प्रसार होऊं शकतो. राष्ट्राच्या वेगवेगळया विभागामध्यें अशा रीतीनें समानतेच्या पातळीवर हा जो संवाद होऊं शकतो तो संवेदनाक्षम मज्जातंतूंच्या यंत्रणेसारखा आहे, आणि त्यामुळें समाजाला लाभणारी शक्ति आणि विकासक्षमता इतर कोणत्याहि मार्गानें मिळणें अशक्य आहे."

भारतांत आज अस्तित्वांत असलेल्या वैज्ञानिक संघटना अशा प्रकारचें कार्य कितपत करूं शकत आहेत, राष्ट्राचा आकार आणि त्याची लोकसंख्या लक्षांत घेतलीतर राज्यसरकारच्या पातळीवर अशा संस्थांची आवश्यकता किती आहे हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

---












अनुक्रमणिका

प्रा. श्री. वा. काळे

# अमेरिकन् तत्त्वज्ञानाची वाटचाल*

## १. महत्त्व

राजनैतिक क्षेत्रांतील भारत-अमेरिका यांचे संबंध स्वातंत्र्यप्राप्ती नंतरच्या गेल्या बारा वर्षांचे कालांत एक प्रकारें अस्थिर असलेले दिसून येतात. एका बाजूस आपलें तटस्थतेचें धोरण, आणि दुसऱ्या बाजूकडून या धोरणाविषयीं प्रकट करण्यांत येणाऱ्या शंका हीं यांचीं प्रमुख कारणें म्हणून सांगतां येतील. राजकीय परिस्थिती किंवा राजनैतिक संबंध बाजूस ठेवून आपण अमेरिकेंत तत्त्वज्ञानाची वाढ आजपर्यंत कशी झाली आणि त्याची पुढील दिशा काय आहे याचा अभ्यास करणें अत्यंत उपयुक्त ठरेल.

कित्येक हजार वर्षांपूर्वी अमेरिकेच्या-म्हणजे अमेरिका खंडाच्या भूमीस-मानवाचा स्पर्श झाला असावा असें मानवशास्त्रज्ञ व पुराणवस्तु-संशोधन शास्त्रज्ञ आपणांस सांगतील. अत्यंत प्राचीन अशा या अमेरिकेंतील संस्कृतीस 'माया' संस्कृति असें नांव देण्यांत आलें आहे. पण या संस्कृतीत कोणतें तत्त्वज्ञान निपजलें हें आजतागायत अपरिचित आहे. उत्तर अमेरिकेच्या संयुक्त राष्ट्रांतील तत्त्वज्ञानाची वाढ मात्र गेल्या तीन चार शतकांतीलच आहे, हें येथें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे.

## २. तत्त्वज्ञान आणि सामाजिक परिस्थिती

प्रत्यक्ष विषयाची चर्चा करण्यापूर्वी आणखी एका गोष्टीचा निर्देश करणें जरूर आहे. तत्त्वज्ञानाची सुरवात 'आनंद-किंवा-सुख' याच्या अनुभवापासून होते कीं 'दुःखापासून' याविषयीं विद्वानांत मतभेद आहेत. पण अमेरिकन् तत्त्वज्ञानाच्या अभ्यासकांस असें दिसून येतें कीं तेथील भौगोलिक परिस्थिती, तज्जन्य व इतर सामाजिक व राजकीय परिस्थिती, आणि त्याचप्रमाणें अमेरिकनांची विशिष्ट स्वभावघडण या गोष्टींचा त्यांचे तत्त्वज्ञानावर बराच परिणाम झालेला आहे. याचें एक उदाहरण म्हणजे अमेरिकेंतील 'फलनिष्पत्ति वाद' ( Pragmatism ). या वादाचें मुख्य सूत्र म्हणजे ज्याला आपण 'सत्य', 'सत्य' ( Truth ) म्हणून म्हणतों तें मुख्यतः फलावर, परिणामावर अवलंबून आहे. आतां हा वाद अमेरिकेतच अधिक यशस्वी कां होऊं शकला ? इतर देशांत त्याची उपयुक्तता विचारी लोकांना कां पटूं नये ? असा प्रश्न उभा राहतो. त्याला हेन्री स्टील् कमेजर या लेखकानें आपल्या 'American Mind' या पुस्तकांत चांगलें उत्तर दिलें आहे. तो म्हणतो, "सर्वसाधारण अमेरिकन माणसाचे-त्याची व्यवहार प्रियता, लोकशाही प्रवृत्ती, त्याचा व्यक्तिवाद, नि संधिसाधकत्व, ( Opportunism ), तसेच त्याची अकृत्रिमता आणि आशावाद-हे गुण या वादाशीं आश्चर्यकारकरीत्या जुळते आहेत." अमेरिकनांच्या विशिष्ट स्वभावरचनेप्रमाणेंच त्यांच्या भौगोलिक आणि सामाजिक परिस्थितीचाहि तेथील तत्त्वज्ञानावर पुष्कळ परिणाम झालेला आहे, असें पुढील विवेचनावरून दिसून येईल.

## ३. महत्त्वाचे कालखंड

अमेरिकेच्या गेल्या साडेतीनशें वर्षांतील इतिहासाकडे पाहिलें तर तत्त्वज्ञानाच्या वाढीचे पुढील महत्त्वाचे कालखंड सांगतां येतील :-

( अ ) प्यूरिटन् परंपरा आणि वसाहतवादाचा काल ( १६१०–१७६० ).

( ब ) स्वातंत्र्यप्राप्तीनंतरची विचारक्रांति, तज्जन्य विचारप्रगल्भता, नि गूढवाद यांचा काल ( १७६०–१८५० ).

( क ) विकासवादाचा काल ( १८५०–१८७० ).

( ड ) आधुनिक कालखंड ( १८७०– ).

वरील चार महत्त्वाच्या कालखंडाचो थोडक्यांत रूपरेखा या लेखांत द्यावयाची आहे.

---

* "Men and Movements in American Philosophy" By Joseph L. Blau या ग्रंथाच्या आधारें पूना फिलॉसॉफी यूनियनपुढें लेखकानें केलेल्या चर्चेचा सारांश.



अनुक्रमणिका






### (अ) प्यूरिटन् परंपरा आणि वसाहतवाद (१६१०–१७६०)

युरोपांतून अमेरिकेंत आलेल्या वसाहतवाद्यांनीं आपल्या मालमत्तेवर, धनदौलतीवर आणि ऋणानुबंधावर पाणी सोडलें पण त्यानां आपल्या धार्मिक आणि तात्विक विचारावर पाणी सोडतां आलें नाहीं. या लोकांनीं आपल्याबरोबर 'कॅल्व्हिनिझम्' पद्धतीचा प्रॉटेस्टंट ख्रिश्चन धर्म अमेरिकेंत आणला. या धर्माचीं कांहीं तत्त्वें सुधारक होतीं. उदाहरणार्थ, 'देव' आणि 'मनुष्य' यांच्या प्रत्यक्ष परस्पर संबंधावर त्यांचा विश्वास असे. देव हा प्रत्येक व्यक्तींत वास करतो, त्याचप्रमाणें तो प्रत्येक धर्ममंदिरांतहि असतो. म्हणून धर्ममंदिरें परस्परांपासून स्वतंत्र नसावींत असें यांचें मत असे. परंतु त्यांचीं राजकीय मतें हीं लोकशाहीस विशेष अनुकूल नव्हतीं. राजकारणांतहि धर्माच्या अधिसत्तेवर त्यांचा विश्वास होता. या प्रतिगामित्वाचा अमेरिकन लोकांच्या दृष्टीनें एक फायदा असा झाला कीं धर्माच्या अधिसत्तेपेक्षां लोकांच्या अधिसत्तेची कल्पना त्यांना अधिक बरी वाटूं लागली. "फंडामेंटल राइटस् ऑफ दी पीपल्" हें तत्व प्युरिटनांच्या विरोधामुळें अधिक रुजलें तें या कालांत.

या पहिल्या कालखंडास आपण वसाहतवादाचा काल असेंहि संबोधतो. कारण या कालखंडांतील तत्त्वज्ञानविषयक सर्व कल्पना या युरोपांतून आयात केलेल्या अशा आढळतात. पण त्या अमेरिकन लोकांस इतक्या मानवल्या कीं त्या युरोपापेक्षां अमेरिकेंतच नंतर अधिक प्रभावी होऊन राहिल्या. प्यूरिटन् लोक स्वतः शास्त्रज्ञ नसले तरी ते शास्त्रीय प्रवृत्तीचे होते. पदार्थविज्ञान शास्त्रांतील न्यूटनच्या सिद्धांताचा त्याच्या विचारसरणीवर झालेला एक परिणाम म्हणजे विश्व हें एक सुचलित यंत्रासारखें आहे ही कल्पना (Universe is a Mechanical Model) प्यूरिटन पंथीय लोकांचा दुसरा एक आवडीचा लेखक म्हणजे ब्रिटिश तत्त्ववेत्ता जॉन लॉक्. विशेषतः लॉक्चें राज्यविषयक उदारमतवादी तत्त्वज्ञान वसाहतवादाच्या युगामध्यें अमेरिकेंत बरेंच प्रिय होतें. न्यूटन आणि लॉक् या दोन लेखकांच्या परिशीलनामुळें अमेरिकन् पंडितांना जडवाद, (Materialism) आणि चेतनवाद (Spiritualism) इत्यादि पंथाची ओळख झाली. तसेंच या दोन पंथाना कांहीं अनुयायीहि मिळाले. **कॅडवॉल्डर कोल्डननें** जडवाद व मुलवाद यांचा पुरस्कार केला तर **जोनॅथन् एडवर्डस्**नें आत्मवादास पाठिंबा दिला.

### (ब) क्रान्तियुग, विचारप्रगल्भता नि गूढवाद यांचा काल (१७६०–१८५०)

या युगांत वैचारिक बंडखोरी—राजकीय बंडखोरी प्रमाणेंच—अधिक प्रभावी झाली. ईश्वरानें विश्व निर्माण केल्यावर त्याचें कार्य संपलें. आतां विश्वाचा भविष्यकाल विश्वांतील शक्तींच्या—मानवशक्तीच्या-हातांत आहे असें सांगणारा विश्वकर्मावाद (Deism) पुढें आला. या राजकीय व वैचारिक बंडखोरीमुळेंच स्वतंत्र अमेरिकन् प्रजासत्ताक जन्मास आलें. स्वातंत्र्य युद्धाचे नेते आणि विचारक्रांतीचे नेते हे एकच असणें हें राष्ट्राचे दृष्टीनें एक सुभाग्याचें लक्षण म्हटलें पाहिजे. या कसोटीवरून अमेरिका अधिक भाग्यवान आहे असें म्हणतां येईल. जर्मनीचा प्रख्यात तत्त्वज्ञ हेगेल हा जवळच येनाची सुप्रसिद्ध लढाई चालूं असतां शांतपणें आपल्या तळघरांत चिंतन करीत होता. तसें अमेरिकेच्या विचारवंताचें झालें नाहीं. अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धाचे नेते म्हणजे बेंजामिन् फ्रॅंक्लिन्, टॉमस् पेन्, थॉमस् जेफरसन्, आणि बेंजामिन् रश. पण याच पुढाऱ्यांच्या लिखाणामुळें "धर्मरहित उदारमतवाद, विश्वकर्मावाद, मानवपूर्णतावाद, शास्त्रीय बुद्धिवाद, लोकशाहीवाद, किंवा अनिर्बंध व्यापाराचें तत्त्वज्ञान" (Laissez faire) हेंहि लोकांना परिचित झालें. राजकारण आणि तत्त्वज्ञान यांची सांगड पडल्यामुळें फायद्याप्रमाणेंच कांहीं तोटेहि झाले. त्यांतील मुख्य तोटा असा दिसतो कीं वैचारिक युद्ध आणि राजकीय युद्ध यांचे प्रणेते एकच असल्यानें त्यांना सावकाश चित्तानें विश्व आणि मानव यांच्या परस्पर संबंधावर विचार करून कांहीं एक सुसूत्र आणि सुव्यवस्थित विचारमालिका मांडण्यास वेळच मिळाला नाहीं. ("Occupied night and day, with the problems of revolution, establishing a nation; developing security and stability, evolving the terms







and conditions of representative government, on an unprecedented scale, they failed to set forth their speculative views systematically).

### विचारस्थैर्य व गूढवाद

स्वातंत्र्य मिळालें आणि त्याबरोबरच स्वातंत्र्यपूर्व कालाहून निराळे प्रश्न उभे राहिले. आतां देशाला स्वास्थ्य व स्थैर्य हवें होतें. फ्रेंच क्रांतीनें अटलांटिक महासागर पार करून येऊं नये अशी अमेरिकनांची इच्छा असणें स्वाभाविक होतें. जेफर्सन्च्या स्वातंत्र्य घोषणेची, त्यानें पास करून घेतलेल्या धर्मस्वातंत्र्याच्या कायद्याची महती कमी वाटूं लागली. पण त्याचवेळीं तत्त्वज्ञान या विषयाची महती विद्यामंदिरामध्यें आणि विद्यापीठांत वाढूं लागली. स्कॉटिश तत्त्वज्ञानाचे प्रवर्तक रीड, कंडवर्थ, शॅफ्टस्बरी, यांचा सर्वसामान्य वास्तववाद (Common serve Realism) हें एक अधिकृत तत्त्वज्ञान झालें. क्रांतियुद्धास मनांतून विरोध करणारे हॅमिल्टनसारखे लोक म्हणूं लागले कीं तत्त्वज्ञान हें जनतेपासून दूरच असलें पाहिजे—कारण जनता ही पशुतुल्य आहे. ("The peopel! Your people, Sir, is a great beast!"). टेलर आणि ड्यू हे तत्त्वशोधक शिकवूं लागले कीं गुलामगिरीत कांहीं तथ्य आहे, आणि गुलामगिरीच्या विरोधकानां विरोध करण्याचा प्रत्येकास हक्क आहे. या काळांतील प्रातिनिधिक विचारप्रवाहांचें उदाहरण द्यावयाचें झाल्यास फॅन्सिस् वेलॅंड याच्या विचारांचें देणें योग्य होईल. त्याच्या मतें विद्यापीठें हीं सांस्कृतिक व सामाजिक शिक्षणाचीं केन्द्रें झालीं पाहिजेत. सत्यज्ञान हें नुसतें मानवाच्या इच्छेवर अवलंबून नाहीं, तर तें मानवाच्या मानसिक पातळीवर अवलंबून आहे. मनुष्यामनुष्यांत सत्याभिमुखतेच्या बाबतींत नैसर्गिक फरक असूं शकतो.

### गूढवाद

या कालखंडांत गूढवादहि पुढें आला. शेलींग, एस्० टी० कोलरिज, तसेंच कांहीं हिंदी गूढवादी यांच्याशीं संबंध आल्यामुळें अमेरिकेच्या न्यू इंग्लंड संस्थानांत गूढवादी वाङ्मयाची अभिरुची निर्माण झाली. अमेरिकन् तत्त्वज्ञानाच्या दुसऱ्या कालखंडांतील या गूढवादी प्रवृत्तीच्या युगास 'ट्रान्सेन्डेण्टल पीरियड्,' 'अॅन् इरा ऑफ वाइल्ड ओटस् फ्रॉम न्यू इंग्लंड' असेंहि म्हणतात. गूढवादी रॉफ वॉल्डो इमर्सन सर्वांना सुपरिचित व प्रसिद्ध आहे. त्याला कन्कॉर्डचा महर्षि म्हणतात. इमर्सन्चा एक गूढविचार म्हणजे निसर्ग ही एक मानवी मनाचीच उत्प्रेक्षा आहे (Methaphor of human mind). त्यामुळें गूढवादी हा निसर्गाशीं एकरूप होऊं शकतो. गूढवादी परंपरेंतील आणखी एका सुप्रसिद्ध व्यक्तीच्या विचाराची आपणांस ओळख करून घेतली पाहिजे. ती व्यक्ती म्हणजे थोरो. त्यानें लिहिलेल्या 'सिव्हिल् डिस्ओबिडियन्स्' या विषयावरील लेखामुळेंच महात्मा गांधींना आपलें सत्याग्रहाचें तत्त्वज्ञान मांडण्याची स्फूर्ति झाली.

### (क) विकासवादाचा कालखंड

(१८५०-१८७०)

हर्बर्ट स्पेन्सर, चार्लस् डार्विन यांच्या विकासवादाची लाट आतां अमेरिकेच्या उत्तर किनाऱ्यावर येऊन आदळूं लागली होती. विकासवादामुळें वैचारिकदृष्ट्या एकमेकांत विरोध असलेले जेफर्सन् किंवा हॅमिल्टन यांच्यासारखे लेखकहि शास्त्रीय बाबतींत एकच मतें मांडत होते. उदाहरणार्थ, जुन्या प्राणिसृष्टीच्या अस्पष्ट खाणाखुणा असलेल्या खडकांचा भूप्रस्तरशास्त्राच्या आणि प्राणिशास्त्राच्या दृष्टीनें अभ्यास व्हावयाच्या बाबतींत दोघांचीहि एकवाक्यता होती. उत्क्रान्तिवादाचा जोरदारपणें पुरस्कार करण्यांत चॅन्सी राइट् आणि टी. अॅबट् यांचा उल्लेख करतां येईल. चॅन्सी राइटनें अमेरिकेंत प्रथम उत्क्रान्तिरूप निसर्गवाद मांडला. तो गूढवाद्यांच्या साफ विरुद्ध होता. जीवसृष्टि, मनोव्यापार, सहजप्रवृत्ति, बुद्धि, मानव बोलतो ती भाषा या सर्व विश्वांतील विकासाच्या पायऱ्या आहेत असें त्याचें मत होतें. टी० अॅबट्नें इन्व्होल्यूशन्- किंवा सत्कार्यवाद – हें तत्त्व मांडलें.

### आधुनिक कालखंड (१८७०- )

विसाव्या शतकाच्या जवळ जसजसे आपण येऊं लागतो तसतसें अमेरिकन तत्त्वज्ञान हें पूर्वीसारखें एकांगी विचारानीं भरलेलें आढळत नाहीं. तें सर्व प्रकारच्या मतामतांतरानी समृद्ध झालेलें आढळतें. तसेंच त्याला राजकीय, सामाजिक परिस्थितीच्या पलीकडे जाऊन विचार करण्याची पात्रता व प्रगल्भता आली आहे असें दिसतें.








आधुनिक कालखंडांतील सर्व मतप्रवाहांची चर्चा येथें सविस्तर करणें कठीण असल्यानें प्रमुख तात्त्विक मतांचा धांवता आढावा घेऊन हा लेख संपवितों.

प्रस्तुत कालखंडांत पुढील मतांना अधिक प्राधान्य मिळालेलें दिसतें.

## ( अ ) आत्मसत्तावाद ( Idealism )

आत्मसत्तावाद या तत्त्वज्ञानांतील मताचीं दोन अंगें आहेत. ( १ ) ज्ञानशास्त्रदृष्ट्या (Epistemology) ( ज्ञेय- ) ज्ञान-ज्ञाता-प्रमाण या त्रिपुटींत ज्ञात्यास प्रधान स्थान आहे ( २ ) अध्यात्मशास्त्र–( Metaphysics ) दृष्ट्या चराचर अखिल सृष्टीचे बुडाशीं आत्मतत्त्व प्रधान आहे. अमेरिकेत आत्मवादाच्या पुढील शाखा दिसून येतातः–

( १ ) बोन्‌चा जीवात्मवाद ( Personal Idealism )

( २ ) जोशिया रॉइस्‌चा पूर्ण आत्मसत्तावाद ( Absolute Idealism )

## ( ब ) फलवाद ( Pragmalism )

अमेरिकन् फलवाद आणि ब्रिटिश अनुभववाद ( Empiricism ) यांत साम्य व भेद आहेत :-

फलवादांत ज्ञानस्वरूपाचा प्रश्न सोडविण्याच्या खटपटीपेक्षां ज्ञानाच्या प्रक्रियेचा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न आहे. फलवाद असें सांगतो कीं, विचार हें एकप्रकारचें वर्तन ( conduct ) आहे. फलवादाच्या प्रमुख शाखा पुढीलप्रमाणें आहेतः–

( १ ) चार्लस् पीयर्सचा ऑपरेशनिझम् ( व्याप्तृतिवाद ).

( २ ) विल्यम् जेम्सचा रॅडिकल् एम्पिरिसिझम्– ( मूलगामी अनुभववाद ).

## ( क ) वास्तववाद ( Realism )

अमेरिकेंतील वास्तववादाच्या तत्त्वज्ञानास जोराची चालना मिळाली, ती सहा अमेरिकन वास्तववाद्यांनीं एकत्र येऊन वास्तववादी अशी नवीन परंपरा सुरू करण्याची घोषणा केली यामुळें होय. या सहा वास्तववाद्यांपैकीं कांहींनी प्रत्यक्ष ज्ञानवाद ( Theory of Direct Perception ) मांडला. तर कांहींनी चिकित्सक वास्तववाद मांडला. वास्तववाद्यांत पेरी, लव्हजॉय, ड्यूरष्ट ड्रेक, प्राट्, रॉजर्स यांचा प्रामुख्यानें उल्लेख करावा लागेल.

## ( ड ) निसर्गवाद (Naturalism)

निसर्गवादाचा मुख्य सिद्धान्त म्हणजे निरीक्षणीय अशा नैसर्गिक घटनांवर त्या संपूर्णपणें सत्य व स्वतः-सिद्ध असल्याबद्दलचा विश्वास. ज्यास आपण मन, व्यक्तिमत्त्व म्हणतो तेंहि निसर्गाचें योग्य घटक समजलें पाहिजे. अमेरिकन् निसर्गवादाचे दोन प्रमुख आधार-स्तंभ म्हणजे जॉर्ज संतयाना आणि जॉन ड्यूई हे होत.

जॉर्ज संतयाना यांचे तत्त्वज्ञानावर ग्रीक तत्त्वज्ञान व स्पिनोझा यांचे विचारांचा प्रभाव पडला आहे. जॉर्ज संतयाना यांचे विचारांचें मुख्य सूत्र म्हणजे निसर्ग आणि मानवी ध्येयें यांत विरोध नाहीं, तर निसर्ग हा ध्येयात्मक असतो आणि ध्येयें हीं पूर्णपणें नैसर्गिक असतात. निसर्ग म्हणजे सर्व शास्त्रें व सर्व कला यांनी शोधून काढलेल्या तत्त्वांचें एक संपूर्ण समीलन होय. नीति व धर्म यामध्येंहि नैसर्गिकता व ध्येयवाद यांचा संगम दिसतो.

अमेरिकन तत्त्वज्ञानाचे एक आधुनिक मुनि जॉन ड्यूई हेहि निसर्गवादींच होत. पण ते साधनवादी किंवा प्रायोगिक निसर्गवादी ( Instrumentalist किंवा Experimental Naturalist) आहेत. ज्ञान हें साध्य नसून साधन आहे. विचाराची प्रक्रिया हेंहि एक मानवाच्या जवळ असलेलें एक उत्कृष्ट साधन आहे. विचाराच्या साधनानें मनुष्य आपल्या पुढील प्रश्न सोडवितो आणि अशा रीतीनें विचाराच्या पलीकडे जातो. निसर्गाविषयीं ड्यूईचे विचारहि मननीय आहेत. निसर्गांत आपण अपघात, अकल्पित घटना, किंवा संभव ( Chance ) यांचा घ्यावा तसा योग्य कानोसा घेत नाहीं असें ड्यूईचें मत आहे. निसर्गांत नियम, तसेंच नियमाभावहि आहेत. नीति आणि सामाजिक तत्त्वज्ञान यांचा मुख्य आधार म्हणजे व्यावहारिक प्रश्नांची सोडवणूक करण्याकरितां केलेली बुद्धीची साधना. लोकशाहीमध्यें विचारामध्यें आणि कृतींत पण प्रायोगिकता पाहिजे. स्वातंत्र्य, समता हे मनुष्याचे स्वाभाविक हक्क आहेत असें जेफर्सन्‌चें तत्त्वज्ञान होतें








तर हे हक्क मानवानें सहकार्यानें व प्रयत्नानें मिळविण्याच्या गोष्टी आहेत असें ड्यूई म्हणतात. धर्माचा आधारहि मुख्यतः ध्येय व व्यवहार, अनुभूत आणि अननुभूत यांची सांगड घालण्यांत सांपडतो.

### ४. समारोप

ड्यूई हे वर सांगितल्याप्रमाणें आधुनिक अमेरिकन् तत्त्वज्ञानाचे महामुनि आहेत. गेल्या पंचवीस वर्षांत निसर्गवादाचीं जीं वेगवेगळीं रूपें अमेरिकेंत दिसून आलीं त्या सर्वांवर जॉन ड्यूई यांच्या निसर्गवादाची अधिकाधिक छाया पडली आहे. या सर्व मतप्रणालींत कांहीं कांहीं बाबतींत निश्चित वेगळेपणा आहे. पण त्या सर्वांचें एकत्रीकरण केलें असतां अमेरिकन् तत्त्वज्ञानाचें पुढील मार्गक्रमण कसें राहील हें ठरविण्याची शक्ती त्यांत निश्चितपणें आहे असें म्हटलें पाहिजे.

---







राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

प्रा. अ. भि. शहा

# नवीन महाराष्ट्राचें राजकारण

नवभारत मासिकाच्या मे १९६० च्या अंकांत प्रसिद्ध झालेल्या प्रस्तुत लेखकाच्या लेखावर टीका म्हणून श्री. 'चिकित्सक' आणि श्री. पन्नालाल सुराणा यांचे लेख अनुक्रमे जुलै आणि ऑगस्ट या दोन अंकांत आले आहेत. त्यांत उपस्थित केलेल्या कांहीं मुद्यांच्या अनुषंगानें हा लेख लिहिला आहे. 'कांहीं मुद्दे' म्हणण्याचें कारण असें कीं असे प्रश्न केवळ चर्चेनें संपूर्णतः कधींच सुटूं शकत नाहींत. अशा परिस्थितींत चर्चेचा उद्देश एक दुसऱ्यांचे दृष्टिकोण पूर्वग्रह न ठेवतां समजून घेणें, आणि शक्य झाल्यास अधिकाधिक विचारवंतांना मान्य होईल असा मार्ग सुचविणें एवढा होय. परंतु मनुष्याचा स्वभाव विकारशील आहे, आणि म्हणून चर्चा एकदां सुरू झाली कीं ती शेवटपर्यंत पूर्वग्रहरहित राहील अशी हमी कोणी देऊं शकणार नाहीं. बरें, पूर्वग्रह टाळतां आला तरी मनुष्याचें, आणि त्यांतल्यात्यांत विचार करूं पाहणाऱ्या मनुष्याचें, संस्कारवैविध्य लक्षांत घेतलें तर प्रत्येक वादांतून सर्वमान्य सत्य सांपडेल अशी आशा बाळगणें चुकीचें होईल. याचा अर्थ वाद करूं नये असा नव्हे; परंतु वादांत उपस्थित केले जाणारे सर्व मुद्दे लक्षांत घेण्याचें प्रयोजन नाहीं. प्रस्तुत बाबतींत तर हें विधान नेहमींपेक्षा अधिक लागूं पडतें. कारण कीं श्री. 'चिकित्सक' यांनीं माझ्या मूळ लेखाला धरून लिहिलें आहे; परंतु त्यांची भाषा श्री. सुराणा म्हणतात तशी कांहीं ठिकाणीं 'नको इतकी तिखट' आहे इतकेंच नव्हे तर एका विशिष्ट मर्यादेचें उल्लंघन न करतां त्यांच्या आक्षेपांना उत्तर देणें अवघड आहे. श्री. सुराणा यांचा लेख गंभीर चर्चेला साजेसा आहे, परंतु त्याचा बराच भाग माझ्या मूळ लेखाशी असंबद्ध आहे. म्हणून त्यांनीं उपस्थित केलेले काही मुद्दे जरी महत्त्वाचे असले तरी त्यांच्यावर येथें लिहिणें अप्रस्तुत ठरेल.

अगोदर श्री. 'चिकित्सक' यांचा लेख घेऊं. श्री. 'चिकित्सक' हे राजकारणापेक्षां भाषेचे चिकित्सक असावेत असा त्यांचा लेख वाचून ग्रह होतो, दुर्दैवानें त्या दृष्टीनेंहि त्यांनीं माझ्यावर अन्याय केला आहे असें म्हणणें भाग आहे. उदाहरणार्थ, "परंतु पितरांच्या पापांकरितां मुलांना शिक्षा देणें लोकशाही मूल्यांना धरून होणार नाही" या माझ्या विधानाचा उल्लेख करून ते लिहितात कीं, "म्हणजे पितरांनीं केवळ पापें केलीं हें गृहीत धरलें." (जाड ठसा मुळांत.) हें कसें काय तें लक्षांत येत नाही. "श्री. 'चिकित्सक' यांनीं माझ्या एका मराठी वाक्यांतून नसलेला अर्थ काढला," या विधानाचा अर्थ केवळ एका मराठी वाक्यांतून चुकीचा अर्थ काढण्यापलीकडे त्यांनीं कांहीं केलें नाहीं, असा होईल असें वाटत नाहीं. परंतु मराठी भाषेबद्दल बोलण्याचा अधिकार श्री. 'चिकित्सक' यांचा असल्यामुळें त्याविषयीं मी जास्त लिहिणें चुकीचें ठरण्याचा संभव आहे. आपल्या लेखांत अशा बऱ्याच चुका श्री. 'चिकित्सक' यांनीं केल्या आहेत, एवढें सांगून हा मुद्दा येथेंच सोडून देतो.

श्री. 'चिकित्सक' यांनीं केलेला दुसरा अन्याय म्हणजे माहितीच्या अभावीं त्यांनीं सूचित केलेला संधिसाधुपणाचा आरोप होय. "मुंबई महाराष्ट्राचें सांस्कृतिक शक्तिकेंद्र आहे," हें माझें विधान घेऊन त्यांनीं शेरा दिला आहे कीं "हें वाक्य १९५६ सालीं लिहिलें जावयास पाहिजे होतें!" सुदैवानें अशा अर्थाचें वाक्य मी १९५६ सालीं लिहिलें होतें. श्री. 'चिकित्सक' यांच्या माहितीसाठीं तें संबंध वाक्य खालीं देत आहे:

" It is not merely a question of recognizing Maharashtra's claim over Bombay and playing fair with her. What is equally important is the







political and cultural significance of Bombay for Maharashtra as well as for India as a whole ...... (Bombay) is also a nerve-centre of much that is progressive in the life of the nation. It is suicidal to convert it into a Hongkong or a New Delhi. ”

हीं वाक्यें माझ्या “ Satyagraha and Democracy या लेखांतून घेतलेलीं आहेत. हा लेख एका सुप्रसिद्ध इंग्रजी नियतकालिकांत १९५६ सालीं आक्टोबर अंकांत प्रसिद्ध झाला होता. अर्थात् श्री. ‘चिकित्सक’ यांना ही माहिती असावयास पाहिजे होती असें नाहीं. परंतु इंग्रजींत ज्याला ‘लोडेड्’ (loaded) म्हणतात असें विधान कोणत्याहि, किमान जिवंत असलेल्या, व्यक्तीबद्दल करतांना थोडी काळजी घेतली पाहिजे; तसें न केल्यास विधानकर्ता स्वतःच्या अभिरुचीबद्दलच नव्हे तर स्वतःच्या जबाबदारीच्या जाणीवेबद्दलहि संशयास कारण देतो, असें सुचवावयाचें आहे. ही झाली चिकित्सकवृत्तीच्या अभावाची गोष्ट. येथें दुसराहि एक मुद्दा उपस्थित करणें आवश्यक वाटतें. १९५६ सालीं वर उद्धृत केलेलें विधान मी केलें नसतें तर काय झालें असतें ? १९६० सालीं केलेल्या विधानाची सत्यासत्यता किंवा योग्यायोग्यता ठरविण्यास या गोष्टीचा काय उपयोग होऊं शकतो ? कोणतेंहि विधान केव्हां तरी प्रहिल्यांदां केलें जात असतें. तें अगोदर अमक्या वेळीं कां केलें गेलें नाहीं, असा प्रश्न एका विशिष्ट अर्थानें उपस्थित केला जाऊं शकतो हें मला माहिती आहे. परंतु अनेकदां अशा प्रश्नामागची मनोवृत्ति निर्दोष नसते हें लक्षांत ठेवलें पाहिजे. तथापि आपल्या सामाजिक जीवनाचें हें दुर्दैव आहे कीं अनेक सुशिक्षित माणसें अशी मनोवृत्ति दाखवितात. श्री. ‘चिकित्सक’ यांच्या लेखांत ही वृत्ति अनेक ठिकाणीं स्वैरविलास करतांना आढळते : उदाहरणार्थ, जेथें कठोर आत्मपरीक्षणाची गरज आहे तेथें दुसऱ्यांच्या माथीं खापर फोडून मोकळें होण्यास लागणाऱ्या वाक्‌चातुर्यानें ते समाधान मानून घेतात : “महाराष्ट्राच्या आर्थिक जीवनाच्या सर्व नाड्या ” आपल्या काबूंत ठेवणारे “ महाराष्ट्रीयेतर भांडवलदार, ” “ राष्ट्रीय वसाहतवाले, ” इत्यादि शब्दप्रयोग टाळ्या मिळविण्यासाठीं ठीक आहेत; महाराष्ट्रीय समाजाच्या हाडामांसांत पसरलेल्या जातीयवादाच्या व्याधीचें निदान करण्यास आणि त्यावर उपाय शोधून काढण्यास त्यांचा कांहींहि उपयोग नाहीं.

अन्यायाचे वर उल्लेख केलेले दोन प्रकार श्री. ‘चिकित्सक’ यांनीं केलेल्या तिसऱ्या प्रकारापुढें प्रेमाचे आणि सौजन्याचे वाटतात. हा तिसरा प्रकार म्हणजे प्रतिपक्ष्यावर बौद्धिक अप्रामाणिकतेचा आरोप करणें हा होय. आरोपाचें स्वरूप गंभीर असल्यामुळें माझें मुळांतलें विधान आणि श्री. ‘चिकित्सक’ यांची टीका थोड्या विस्तारानें देणें आवश्यक आहे.

माझें मूळ विधान असें आहे : “ राजकीय सत्तेच्या जोरावर ... मराठ्यांचें संपूर्ण आधिपत्य नसलें तरी त्यांचें वर्चस्व निर्माण होईल—असें (ब्राह्मणांना वाटणाऱ्या) या भीतीचें स्वरूप आहे. ब्राह्मणसमाजाचा अहंकार, त्याची जातीय वृत्ति आणि ब्राह्मणेतरांवर त्यानें शतकानुशतकें गाजवलेली सत्ता, इत्यादि दोष मान्य करणाऱ्या सुशिक्षित आणि बुद्धिमान् ब्राह्मण विचारवंतांनाहि महाराष्ट्राच्या समाजपुरुषाच्या रोगाचा हा परिणतिक्रम (Prognosis) मान्य आहे. मात्र ते असें म्हणतात कीं असें होणें अनिवार्य आहे; कांहीं वर्षें ब्राह्मणांनीं अज्ञातवासांत काढलीं पाहिजेत; त्यांनीं आपल्या पूर्वजांच्या किंवा आपल्या पापांचें प्रायश्चित भोगलें पाहिजे ” यावर श्री. ‘चिकित्सक’ यांची टीका अशी आहे : “ ब्राह्मणसमाज अहंकारी व जातीय वृत्तीचा आहे. त्यानें ब्राह्मणेतरांवर शतकानुशतकें सत्ता गाजविली असे त्याचे दोष असल्यामुळें त्याच्यावर आज ओढवूं घातलेलें संकट क्रमप्राप्त आहे ’ असें सरळ न लिहितां व **विधानाची जबाबदारी स्वतःवर न घेतां... आरोप करण्याची जबाबदारी अस्तित्वांत नसलेल्या ब्राह्मण विचारवंतांच्याच गळ्यांत बांधून विधानाच्या जबाबदारींतून आपण बाजूस राहावयाचें** व परिणतिक्रम मान्य आहे या निर्णयास उचलून धरण्यास हळूंच बोट पुढें करावयाचें या वक्ररचनेंतूनच तटस्थतेच्या भूमिकेला किंचित् ढळ पोहोचतो.” (जाड ठसा माझा)

श्री. ‘चिकित्सक’ यांनीं केलेला आरोप दोन भागांत आहे. पहिला भाग म्हणजे ब्राह्मणसमाजाचे पूर्वीचे किंवा आजचे दोष स्वतःच्या नांवानें न सांगतां ते मी









दुसऱ्याच्या तोंडातून वदवून घेतले आहेत; दुसरा आरोप म्हणजे हे दोष ज्यांच्या तोंडातून वदवून घेतले आहेत ते लोक अस्तित्वांत नसलेले ब्राह्मण विचारवंत आहेत. पहिला आरोप भाषिक स्वरूपाचा आहे. मूळ लेख बाळबोध मराठींत लिहिला गेला असता तर श्री. ' चिकित्सक ' यांनां मी कांहीं विधानें स्वतःच्या नांवानें करावयाचें टाळूं पहात आहे असें वाटलें नसतें. परंतु ज्याअर्थी त्यांनीं शंका उपस्थित केली आहे त्याअर्थी येथें स्पष्ट केलें पाहिजे कीं माझ्या लेखांत उल्लेख केलेले दोष खरोखरच त्यांच्यांत आहेत ( किंवा ' होते '—वेगवेगळया दोषांना वेगवेगळा ' काळ ' लागू पडेल म्हणून हा वैयाकरणिक विकल्प योजिला आहे, निःसंदिग्ध विधान करण्याची जबाबदारी टाळण्याकरितां नव्हे ) असें माझें मत आहे. " ब्राह्मणांचे दोष कमी अधिक प्रमाणांत प्रत्येक जाति स्वतःपेक्षां कनिष्ठ जातींशीं वागतांना दाखवीत आहे " हें माझें विधान श्री. ' चिकित्सक ' यांना एकापेक्षा अधिक दृष्टीनें पुरेसें वाटावयास पाहिजे होतें.

श्री. ' चिकित्सक ' यांचा दुसरा आरोप गंभीर स्वरूपांचा आहे, परंतु तोहि चुकीचा आहे. महाराष्ट्राच्या गेल्या बारा वर्षांच्या राजकीय आणि सामाजिक इतिहासाची थोडीशी आठवण असलेल्यानें असा आरोप केला नसता. मला अभिप्रेत असलेल्या ब्राह्मण विचारवंतांचीं नांवें येथें देत नाहीं त्याचें कारण ते अस्तित्वांत नाहींत म्हणून नव्हे, तर त्यांची इच्छा माहीत नसतांना त्यांना वादांत ओढून घेणें योग्य होणार नाहीं म्हणून. श्री. 'चिकित्सक' यांच्या समाधानाकरितां एवढेंच सांगतो कीं या विचारवंतांत जातीच्या दृष्टीनें चित्तपावनांपासून कऱ्हाड्यांपर्यंतचे, आणि राजकीय मतांच्या दृष्टीनें मार्क्सवाद्यांपासून कॉंग्रेसवाद्यांपर्यंतचे ब्राह्मण आहेत; तसेंच त्यांच्यांत अर्थशास्त्रज्ञहि आहेत आणि प्राच्यविद्याविशारदहि आहेत; राजकीय पुढारीहि आहेत आणि महाविद्यालयीन प्राध्यापकहि आहेत. त्यांची संख्या लहान आहे हें खरें, परंतु हें स्वाभाविक आहे. ही संख्या मोठी असती तर महाराष्ट्राच्या जातिवादाचा प्रश्न लवकरच सुटण्याच्या मार्गास लागला असता, आणि **नवभारत** मासिकांत हा वाद सुरूंहि झाला नसता.

श्री. ' चिकित्सक ' यांनीं घेतलेले बरेचसे आक्षेप माहितीचा अभाव, भाषिक गैरसमज, राग आणि तद् जन्य बौद्धिक निष्काळजीपणा यांतून निर्माण झालेले आहेत; म्हणून त्यांचा अधिक विस्तारानें विचार करण्याचें प्रयोजन नाहीं. उरलेल्यापैकीं एकदोन महत्त्वाच्या आक्षेपांचें निराकरण करण्याचा प्रयत्न करून त्यांच्या लेखास प्रत्युत्तर संपवितो.

श्री. ' चिकित्सक ' लिहितात कीं : " प्रा. शहांनीं केलेला विचार सर्वांग परिपूर्ण नाहीं... महाराष्ट्राच्या आर्थिक जीवनाचीं सर्व अंगें लक्षांत घेऊन ... समान वाटपाचा विचार झालेला नाही." हा आक्षेप अनाठायीं आहे, असें वाटतें. कारण कीं माझ्या मूळ लेखाच्या सुरुवातीस त्याच्या कक्षा मी स्पष्टपणें विशद केल्या होत्या; त्या अशा होत्या : " ( ब्राह्मणांना वाटणाऱ्या ) या भीतीचें स्वरूप, तिचा पारिस्थितिक ( empirical) संदर्भ, आणि नवीन महाराष्ट्राच्या विकासावर तिचे होणारे परिणाम — यांचा येथें थोडक्यांत विचार करण्याचें ठरविलें आहे." केवळ आर्थिक उपायानें जातीयवादाचा प्रश्न सुटूं शकेल असें मला वाटलें असतें तर " महाराष्ट्राच्या आर्थिक जीवनाचीं सव अंगें लक्षांत घेऊन समान वाटपाचा विचार " करण्याचा प्रयत्न मी केला असता. परंतु श्री. ' चिकित्सक ' यांना वाटतें कीं " आर्थिक समतेचा प्रश्न सुटला कीं सारे कलह आपोआप मिटतील ", कारण कीं त्यांच्या मतें " कलहाचीं मुळें प्रथमतः आर्थिक विषमतेंत असतात ". समतेचें मूल्य मान्य असणाऱ्यानांहि, ते कम्युनिस्ट नसले तर त्यांना, हीं विधानें मान्य होतील कीं नाहीं याबद्दल शंका आहे. सामाजिक जीवनाचे प्रश्न इतके सोपे असते तर फार बरें झालें असतें. परंतु सामाजिक आणि सांस्कृतिक जीवनाच्या प्रश्नांचीं मुळें यापेक्षा अधिक खोल असतात. जातीयवादाचा प्रश्नहि अशांतला आहे असें माझें मत असल्यामुळें सर्वमान्य आणि सर्वप्रिय परंतु प्रस्तुत विषयाशीं असंबद्ध असणाऱ्या आर्थिक गोष्टींचा विचार मी मूळ लेखांत केलेला नाहीं.

शेवटीं एक स्पष्टीकरण श्री. ' चिकित्सक ' म्हणतात कीं, " ब्राह्मणेतरांना प्रशासकीय क्षेत्रांत नोकऱ्या कशा द्याव्यात ह्याविषयीं प्रा. शहांनीं जी रीत सुचविली आहे ती व्यक्तिस्वातंत्र्याच्या, मानवतेच्या व व्यापक











अनुक्रमणिका

नीतीच्या तत्त्वास हरताळ फासणारी आहे." माझें मूळ विधान "नियुक्त कार्य समाधानकारकरीत्या करण्याकरितां लागणारे किमान गुण असलेल्या" ब्राह्मणेतर उमेदवारांबद्दल आहे; तसेंच "गुण आणि कार्यक्षमता यांच्या किमान अटी कधींहि बाजूला सारतां कामा नयेत"; आणि, "एकदां नेमणूक झाल्यानंतर नोकरींत बढती इत्यादि गोष्टी केवळ योग्यतेवर अवलंबून असावयास पाहिजेत"—असे दोन संकेत सांगितले आहेत. या विधानांमागील भूमिका लोकशाही मूल्यांना मारक आहे असें मला अजून तरी वाटत नाहीं. उलट, समाजाच्या वंचित घटकांना आतांपर्यंत न मिळालेल्या संधी उपलब्ध करून देऊन लोकशाही मूल्यांची व्याप्ति वाढविण्यास मदत व्हावी, आणि स्फोट होऊन लोकशाही मूल्यांवरच नव्हे तर व्यापक नीतितत्त्वांवरहि आघात होऊं नये, अशा प्रकारची ही भूमिका आहे. एक गोष्ट मात्र लक्षांत घेतली पाहिजे: आर्थिक क्षेत्रांत अनिर्बंध कृतिस्वातंत्र्य (laissez faire) आणि 'योग्यतमाचा टिकाव' (survival of the fitest) या तत्त्वांचा आज लोकशाहीच्या दृष्टीनें कोणी आग्रह धरत नाहीं. सामाजिक आणि सांस्कृतिक क्षेत्रांतहि या तत्त्वांचें पुनः परीक्षण होणें आवश्यक आहे, असें येथें सुचवावयाचें आहे. तसें न झाल्यास आज जे मागासलेले आहेत ते कायमचे तसेच राहण्याचा संभव आहे. येथें आर्थिक समतेचा प्रश्न नाहीं. उलट ज्या समाजांत सामाजिक आणि सांस्कृतिक समता वा अभिसरण नसतें त्यांत आर्थिक समता एकदा प्रस्थापित झाली तरी टिकाऊ ठरण्याचा संभव कमी आहे. कम्युनिस्ट राष्ट्रांचा अनुभव या बाबतींत फार उद्बोधक आहे.

वर सुचविलेलें पुनःपरीक्षण करून नवीन तत्त्वें स्वीकारतांना कोणते संकेत काटेकोरपणानें पाळले पाहिजेत यांचा उल्लेख नुकताच आला आहे, म्हणून त्यांची येथें पुनरुक्ति करण्याची आवश्यकता नाहीं.

श्री. सुराणा यांचें बरेंचसें विवेचन तात्त्विक पातळीवरचें आहे. सामाजिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या मागासलेल्या जातींना लवकर पुढें येण्यास मीं केलेल्या विशिष्ट सूचनांबद्दल त्यांनीं जवळ जवळ कांहीं म्हटलेलें नाहीं. म्हणून त्यांच्या लेखांत उपस्थित झालेले परंतु मार्गे न आलेले कांहीं मुद्दे यापुढें चर्चेस घेतो.

भारतीय राजकीय संदर्भाचें विश्लेषण करतांना श्री. सुराणा यांनीं केलेलें कॉंग्रेसचें मूल्यमापन कांहीं अंशीं वरपांगी आहे असें वाटतें. हें विधान करतांना कॉंग्रेसच्या दोषांवर पांघरूण घालण्याची इच्छा नाहीं. हे दोष सर्वश्रुत आहेत आणि कॉंग्रेसवालेहि ते नाकारीत नाहींत. प्रश्न आहे तो या दोषांचीं कारणें कोणतीं याबद्दलचा. श्री. सुराणा यांच्या मतें कॉंग्रेस हा "समाजांतील धनवंत, प्रतिष्ठित व जातीच्या दृष्टीनें बहुसंख्य वर्ग" यांचा पक्ष आहे आणि यांत तिच्या दोषांचीं मूळें सांपडतील. याचा अर्थ असा होईल कीं कॉंग्रेसचें राजकीय आणि आर्थिक धोरण वर उल्लेख केलेल्या वर्गांच्या हिताचें आहे व राहील, आणि त्याकरितां समाजवादी तत्त्वांना मुरड घालावी लागली किंवा त्यांचा त्याग करावा लागला तरी कॉंग्रेस तें करील. येथें दोन प्रश्न उपस्थित होतात. एक असा कीं धनवंत-प्रतिष्ठित वर्ग आणि जातीच्या दृष्टीनें बहुसंख्य वर्ग यांचीं हितें एकसारखीं नसलीं तरी एक दुसऱ्यांना अविरोधी आहेत काय? दुसरा प्रश्न असा कीं, स्वातंत्र्योत्तर काळांत कॉंग्रेसचें धोरण धनवंतप्रतिष्ठितांना किंवा एका विशिष्ट जातीला विशेष अनुकूल असें राहिलें आहे काय? मला वाटतें, दोन्हीं प्रश्नांचें उत्तर नकारात्मक द्यावें लागेल. या विधानाची विस्तृत चर्चा करणें मूळ विषयाला धरून होणार नाहीं, म्हणून त्याच्या समर्थनार्थ केवळ कांहीं ढोबळ गोष्टींकडे लक्ष वेधून समाधान मानणें भाग आहे.

अगोदर कॉंग्रेसचें आर्थिक धोरण घेऊं. एका रात्रींत आयुर्विमा कंपन्यांचें राष्ट्रीयीकरण, नियोजनांत शासकीय विभागाला दिलें जाणारें महत्त्व, चुकीच्या स्वरूपांत कां असेना पण सहकारी शेतीवर दिला जाणारा भर, हळू का असेना परंतु जमीनदारीचें होत असलेलें उच्चाटन, कारभाराच्या विकेंद्रीकरणास दिलेली मान्यता आणि त्या दिशेनें सुरू झालेले प्रयत्न, कामगार कल्याण विषयक कायदे—या गोष्टी धनवंत—प्रतिष्ठितांच्या पक्षानें मान्य तरी केल्या असत्या का? दुसरें असें कीं कॉंग्रेसच्या वरिष्ठ नेतृगणांत मार्क्सच्या अर्थानें बुझ्वाजी-(bourgeoisie) चे प्रतिनिधी म्हणतां येतील असे किती लोक सांपडतील? आणि कम्युनिस्टांचे किंवा जनसंघाचे सहप्रवासी किती सांपडतील?








कॉंग्रेसचें राजकीय धोरणहि विविधलक्षी आहे. त्यांत लोकशाही आहे, समाजवाद आहे, साम्यवाद आणि हिंदुत्ववादाचीं बीजेंहि आहेत. प्रजा-समाजवाद्यां-पेक्षां कम्युनिस्टांना अधिक जवळचे समजणारे आणि कम्युनिस्टांच्या सावलींतहि उभे न राहणारे; विनोबांना प्रणाम करून बेसिक शिक्षणाची महती गाणारे आणि खरकपूर व पवई यांची स्थापना करणारे; भारत धर्मा-तीत राज्य आहे म्हणून अभिमान बाळगणारे आणि आणि राज्यसरकारतर्फे फल ज्योतिषशास्त्राला पुनर्जीवन देणारे आणि हिंदुधर्मविधि अनुसार सार्वजनिक पूल, इत्यादींचें उद्‌घाटन करणारे— असे सर्व प्रकारचे लोक कॉंग्रेसचें धोरण ठरविणाऱ्या नेतृवर्गांत आढळतात. आढळत नाहीं तो भांडवलदारांचा किंवा मोठ्या जमीनदारांचा प्रवक्ता म्हणून ओळखतां येईल असा गट.

जातीच्या दृष्टीनेंहि कॉंग्रेस बहुसंख्य असलेल्या वर्गाचा पक्ष एका मर्यादित अर्थानेच होऊं शकतो.[1] श्री. सुराणा यांनीं दिलेल्या उदाहरणांत संख्याप्रमाणें नसल्यामुळें त्यांच्या विधानांतून विश्वासार्ह निष्कर्ष काढणें कठिण आहे, जे कांहीं आंकडे मला माहीत आहेत त्यावरून त्यांच्या विधानाला पुष्टि मिळेल असें वाटत नाहीं. उदाहरणार्थ, महाराष्ट्रांत मराठा जात एकूण लोकसंख्येच्या ३० टक्के भरते, हें माझ्या मूळ लेखांत आलेंच आहे. केरळमध्यें येळवा जात २५ टक्क्याच्या आसपास आहे आणि ती कॉंग्रेसपेक्षा कम्युनिस्ट पक्षाच्या मागेंच अधिक आहे. राजस्थानांत जाट आणि राजपूत लोकसंख्येच्या ९ टक्के आणि ६ टक्के आहेत. हे आकडे श्री. सुराणा यांच्या विधानास पोषक नाहींत.

मग कॉंग्रेसचे दोष येतात तरी कोठून ? मला वाटतें कीं त्यांचें मूळ तिच्या बहुरंगी, विविधलक्षी स्वरुपांत आणि ऐतिहासिक पार्श्वभूमींत शोधलें पाहिजे. स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर भारतीय ग्रामीण जनतेला पहिल्यांदा देशाच्या राजकारणावर आपला प्रभाव पाडण्याची संधि मिळाली, ही वस्तुस्थितिहि कॉंग्रेसचें स्वरूप पालटण्यास जबाबदार आहे. हें चांगलें झालें कीं वाईट, हा प्रश्न नाहीं; कारण कीं सार्वत्रिक प्रौढ मतदानाच्या हक्कावर उभारलेली लोकशाही समाजरचना निर्माण करावयाचें ठरविल्यावर कांहीं गोष्टी घडणें क्रमप्राप्त आहेत. परंतु याचा परिणाम असा झाला कीं स्वातंत्र्यपूर्व काळांत सुशिक्षित नागर मध्यमवर्गाचें नेतृत्व असलेली कॉंग्रेस हळूहळू ग्रामीण मध्यमवर्ग आणि शेतकरी यांच्या पक्षांत राज्यसरकारच्या पातळीवर रूपांतर पावूं लागली. अखिल भारतीय पातळीवर कॉंग्रेसचें नेतृत्व अजून नागर मध्यमवर्गाचें आहे. परंतु प्रांतिक कॉंग्रेस कमेट्या आतां बऱ्याच ठिकाणीं त्याच्या हातांतून गेल्या आहेत, आणि म्हणून नागर मध्यमवर्ग कॉंग्रेसमधून बाहेर पडला आहे. या वर्गानें कोणत्याहि देशांत आतांपर्यंत ग्रामीण समाजाचें नेतृत्व किंवा वर्चस्व मान्य केलेलें दिसत नाहीं. त्याचा व्यवहार एकतर फार हिशोबी असतो, नाहींतर स्वप्नाळू ध्येयवादाचा असतो.[3] सांस्कृतिक दृष्ट्या समाजांत सर्वांत अधिक प्रगत असल्यामुळें या वर्गाला सामाजिक अन्याय, सार्व-जनिक जीवनांत पदोपदीं दिसत असलेली अनै-तिकता, इत्यादींची त्याला चीड येते आणि पद-दलितांच्या आदर्श समाजाचीं स्वप्नें तो उराशीं बाळगतो. परंतु क्रान्तिकारकाला अभिप्रेत असलेला सर्वगुणसंपन्न बहुजनसमाज अजून अस्तित्वांत यावयाचा आहे. म्हणून एकदा क्रान्ति झाली आणि बहुजनाच्या 'खऱ्याखुऱ्या' प्रतिनिधींच्या हातांत सत्ता गेली कीं लवकरच या वर्गाचा भ्रमनिरास होतो. शहर आणि खेडीं यामधलें सांस्कृतिक अंतर अजिबात नाहींसें होणें अशक्य आहे. परंतु हें अंतर आजच्यापेक्षा फार

१. जात ही राज्यसरकारच्या पातळीवर प्रभावी असलेली संस्था आहे, केंद्र सरकारपर्यंत तिचा प्रभाव पोहोंचत नाहीं, हें मान्य होईल असें येथें गृहीत धरलें आहे.

२. गुजरातमध्यें जातीयवादाचा प्रश्न नसल्याचें कारण श्री. 'चिकित्सक' यांना वाटतें तसें आर्थिक नसून वेगळें आहे.

आंध्र, तामीळनाड, कर्नाटक, बिहार, इत्यादि राज्याची आंकडेवार माहिती येथें उपलब्ध नसल्यामुळें त्यांच्याबद्दल या घटकेस कोणतेंहि निश्चित विधान करणें शक्य नाहीं.

३. याला अपवाद असतात हें वेगळें सांगावयास नको.








कमीं होत नाहीं तोपर्यंत ग्रामीण समाजाचें प्रतिनिधित्व करणाऱ्या कोणत्याहि पक्षाचें सरकार सुशिक्षित नागर मध्यमवर्गाला 'आपलें' म्हणून वाटणार नाहीं. हें विधान आर्थिक हितसंबंधाच्या निरपेक्ष आहे; आर्थिक हितसंवाद असूनहि सांस्कृतिक संघर्ष किंवा दुरावा असूं शकतो. सांस्कृतिक अंतराबरोबर आर्थिक हितसंघर्ष आणि सामाजिक विरोध असले तर परिस्थिति अधिकच असमाधानकारक होणार हें स्वाभाविक आहे.

या विषयावर इतक्या विस्तारानें लिहिण्याचें कारण असें कीं मार्क्सचा आर्थिक नियतिवाद अमान्य करणारे विचारवंतहि आपल्याकडील राजकीय पक्षांचें आणि चळवळीचें विश्लेषण करतांना मार्क्सवादी विचार पद्धतीच्या चाकोरीतून बाहेर पडूं शकत नाहीं असें अनेकदां आढळतें. येथें आर्थिक हितसंबंधांचें अवमूल्यन करण्याचा उद्देश नाहीं. परंतु व्यक्ति जशी केवळ अर्थप्रधान व्यक्ति (Economic man) नसते तसेंच सामाजिक जीवन म्हणजे केवळ आर्थिक संबंधांचें जाळें नसतें. आर्थिक कारणें अनेक बाबतींत महत्त्वाचीं असलीं तरी त्यांचें महत्त्व नेहमीं निर्णायक स्वरूपाचें असतें असें नाहीं. मार्क्सवाद धर्म म्हणून समजला जाणाऱ्या देशांचा अनुभवहि हेंच दाखवितो कीं आर्थिक नियतिवाद हा एक फार एकांगी आणि म्हणून फसवा सिद्धान्त आहे.

महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेसच्या स्वरूपाचें वेगळें विवेचन करण्याची आवश्यकता नाहीं. तिचे दोष नाकारण्याची किंवा तिचा बचाव देण्याची, आणि तें शक्य नसल्यास त्यांच्या निर्मूलनासाठीं प्रयत्न करण्याची प्रत्यक्ष जबाबदारी त्या पक्षाच्या नेत्यांची आणि कार्यकर्त्यांची आहे. परंतु अशा प्रयत्नांस मदत करण्याची जबाबदारी या राज्यांतल्या प्रत्येक लोकशाहीप्रेमी विचारवंताची आहे. कारण कॉंग्रेस ही एका अर्थानें भारतीय समाजाचें लहानसें प्रातिनिधिक चित्र आहे, आणि म्हणून या समाजाचे सर्व अंतर्विरोध, सर्व दोष त्या पक्षांत प्रकर्षानें दिसत आहे. कॉंग्रेसचे दोष तिच्या विशिष्ट धोरणांतून उत्पन्न झालेले नसून उलट तिचें धोरण हेंच अनेकदां भारतीय समाजाच्या सर्वांगीण अपरिपक्वतेचें प्रतिबिंब असतें, हें पाहण्याकरितां गेल्या तीन वर्षांत जेथें जेथें कॉंग्रेसविरोधी पक्ष किंवा आघाड्या सत्तेवर होत्या त्यांच्या कारभाराचा अभ्यास केला पाहिजे. महाराष्ट्रापुरतें बोलावयाचें झाल्यास असें दिसून येईल कीं ग्रामीण विभागांत कॉंग्रेस आणि तिचे डावे विरोधक यांच्या कारभारांत फरक सांगणें अवघड होतें. नागर विभागांत तर विरोधकांनीं कॉंग्रेसवरहि मात केलेली दिसून येते. क्रान्तिकारक अभिनिवेशानें सत्ताग्रहण करणाऱ्या समाजवादी पक्षांना किंवा आघाड्यांना इतक्या लवकर अनेक अनिष्ट प्रवृत्तींशी तडजोड करावी लागत असेल तर त्याचें कारण पक्षांचे कार्यक्रम आणि विचारप्रणाली यांच्यापेक्षां त्या सर्वांच्या मागें असलेल्या बहुजनसमाजाच्या परंपरागत कुंभकर्णीय जाड्यांत शोधलें पाहिजे. आणि म्हणून कॉंग्रेसचे किंवा इतर कोणत्याहि लोकशाही पक्षाचे दोष दूर करण्यास राजकीय विरोध अपुरें साधन आहे. भारतीय जनतेबद्दल स्वतःला वाटणारें प्रेम तिला खरोखर हितप्रद व्हावें अशी इच्छा बाळगणाऱ्यांनीं प्रसंगीं कटुता पतकरूनहि तिला लोकशाहीचें शिक्षण देण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. हें काम दीर्घमुदतीचें आहे. तसेंच तें केवळ सरकार किंवा राजकीय पक्ष यांना शक्य होणारें नाहीं; परंतु त्यांच्या सहकाराशिवायहि तें सफल होणें सोपें नाहीं. ध्येयवादी सुशिक्षितांनाहि हें कार्य म्हणजे एक मोठें आव्हानच आहे.

ब्राह्मणब्राह्मणेतर वादाच्या अनुषंगानें, "सूडाची भाषा जितकी चुकीची आहे तितकीच प्रायश्चित्ताची भाषाहि अयोग्य आहे" हें मला मान्य आहे. परंतु येथें प्रश्न आहे तो सूड किंवा प्रायश्चित्त घेण्याचा नसून आतांपर्यंत अन्याय झालेल्यांचा विश्वास संपादन करण्याचा आहे. ब्राह्मणसमाजाच्या हातांतून सत्ता जाऊं लागल्यापर्यंत त्याची वागणूक या दृष्टीनें फार प्रशंसनीय होती असें श्री. सुराणाहि म्हणणार नाहीं. ब्राह्मणसमाजाचे आधुनिक आद्यप्रतिनिधि म्हणून ओळखले जाऊं शकणारे विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें या प्रश्नावरचें लिखाण पाहिलें कीं ब्राह्मणेतर समाजाला ब्राह्मणसमाजाच्या सद्हेतुबद्दल वाटणारा अविश्वास सहज समजूं शकतो.[४] आजचे कांहीं सुशिक्षित ब्राह्मण

४. पहा: "ब्राह्मणांचें वर्चस्व सहन न होऊन त्यांस विरोध करणारी प्रतिपक्षी मंडळी आजपर्यंत इतकी निर्माण झाली. इतक्यांसहि दाद न देतां आजपर्यंत ब्राह्मण हे या देशांत प्रमुखचे प्रमुख राहिलेच आहेत."
—निबंधमाला, पा. ११५३.








विष्णुशास्त्री यांचीं मतें मान्य करणार नाहींत, हें मला माहीत आहे. परंतु शतकानुशतकें आलेल्या कटु अनुभवांच्या स्मृती केवळ शब्दानें पुसून काढणें कठीण आहे. त्याकरितां प्रायश्चित्त म्हणून नव्हे तर स्वतःच्या हेतूच्या प्रामाणिकपणाची खूण म्हणून कृतीची आवश्यकता आहे. ब्राह्मणांनीं सत्तासंन्यास घेऊनहि बहुसंख्य ब्राह्मणेतरांपासून त्यांचा वेगळा असा सामाजिक व सांस्कृतिक सवतासुभा कायम राहिला तर महाराष्ट्रांत एकसंध समाज निर्माण करण्याच्या दृष्टीनें अनिष्ट ठरण्याचा संभव अधिक आहे. आज गरज आहे ती ब्राह्मणांनीं तात्पुरता किंवा कायमचा संन्यास घेण्याची नसून ब्राह्मण-ब्राह्मणेतर, स्पृश्यास्पृश्य, हिंदु-अहिंदु —या द्वंद्वांच्या घटकांमधला सांस्कृतिक आणि सामाजिक व्यवहारांतला दुरावा नाहींसा करण्याची. याचा अर्थ पुढारलेल्या जातींची सांस्कृतिक पातळी खालावली पाहिजे असा होण्याचें कारण नाही, परंतु कर्मकाण्ड, रोटीबेटी व्यवहार, भक्ष्याभक्ष्य विधिनिषेध, इत्यादि अनेक यांत्रिक ‘ नीतिनियमां ’चें डोळसपणें पुनःपरीक्षण करून त्या अनुसार स्वतःची वैयक्तिक आणि सामाजिक वागणूक बदलण्याची आवश्यकता आहे. आणि या कार्यांत पुढारलेल्या जातींची जबाबदारी फार मोठी आहे, ब्राह्मण जातीची सर्वांत अधिक आहे.

ब्राह्मणांच्या जबाबदारीवर भर देण्याचें कारण असें कीं कायदा सांगतो तेवढीच आपली जबाबदारी आहे असें समजून लोकशाही निर्माण करतां येत नाहीं. ‘ वृद्धा नारी पतिव्रता ’ म्हणून वैराग्य स्वीकारूनहि भागत नाहीं; आणि आमच्या पूर्वजांनीं केलेले अन्याय त्या काळच्या समाजव्यवस्थेंत स्वाभाविक होते, कारण कीं “ आतांपर्यंत ‘ बळी तो कान पिळी ’ हा न्याय सर्वत्र होता ” असें सांगूनहि स्वतःची जबाबदारी टाळतां येत नाहीं. कारण असें कीं याच न्यायानें ब्राह्मणेतरांनीं ब्राह्मणांवर सूड उगविला तर त्यांना दोष देतां येणार नाहीं. आजची समाजव्यवस्थाच अशी आहे कीं ते मुळांत दुष्ट नसले तरी ब्राह्मणेतरांना संघटित होऊन ब्राह्मणांचे कान पिळण्याची मोकळीक देत आहे. आजचीं मूल्यें वेगळीं आहेत म्हणून या निष्कर्षामधून पळवाट काढतां येणार नाहीं; कारण कीं चार्वाकापासून तरी या देशांत आधुनिक मानवी मूल्यें कोणीना कोणीतरी अधूनमधून पुरस्कारलेलीं आहेत. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या काळांत तर जातिव्यवस्थेंत अभिप्रेत असलेल्या अन्यायांना पंडिती किंवा तात्त्विक बैठक देण्याचें कांहींच कारण नव्हतें. ब्राह्मणांच्या आजच्या पिढीस अभय पाहिजे असेल तर तें मार्क्सवादी भूमिकेवरून देतां येत नाहीं, असें अभय एकाच भूमिकेवरून देतां येईल; आणि ती भूमिका अशी कीं पितरांनीं केवळ पापें केलीं असलीं तरीहि “ पितरांच्या पापांकरितां मुलांना शिक्षा देणें लोकशाही मूल्यांना धरून होणार नाहीं. ”

स्पृश्य ब्राह्मणेतरांना ब्राह्मणांच्याबद्दल जशी शंका वाटते तशी अस्पृश्य समाजालाहि सवंर्ण स्पृश्य समाजाबद्दल वाटत आहे. ही शंका दूर होईपर्यंत रिपब्लिकन पक्षास श्री. सुराणा यांनीं केलेल्या सूचना कितीहि चांगल्या असल्या तरी त्या मान्य होण्याचा संभव कमी आहे. केवळ अल्पसंख्य नसून अनेकदृष्टीनें वंचित असलेली अल्पसंख्य जमात बहुसंख्य समाजावर विश्वास टाकूं शकेल अशी परिस्थिति निर्माण होत नाहीं तोपर्यंत तिला संधिसाधु राजकारणाचा दोष टाळतां येणें अशक्य आहे. आणि रिपब्लिकन पक्षाच्या संधिसाधुपणाला त्याचाशी तडजोड करणारे इतर ‘ हतबल ’ पक्ष अधिक जबाबदार नाहींत का ? महाराष्ट्रांत एकहि पक्ष, एकहि पक्षनेता अस्पृश्यता निवारणास लोकशाही निर्मितीच्या कार्याचें अतिशय महत्त्वाचें अंग समजून

---

“ सरतेशेवटीं आकाशांतील प्रभूस ब्राह्मणेतर वर्णांची कींव येऊन त्यानें या भरतखंडाचें राज्य आपल्या लाडक्या लोकांस बहाल केल्यामुळे त्याच्या प्रसादानें ‘ लोकहितवादी ’, ‘ गुलामगिरी’कार, ‘ सत्यदीपिका’धारी असे आज नव ब्रह्मनिष्ठ उदयास येऊन त्यांनीं हें कितीका काळाचें ब्राह्मणाचें बंड मोडून तें ‘ पुरंदरच्या बंडा’च्या भेटीला पाठवण्याचा स्तुत्य उद्योग सुरू केला आहे ! ”— किता, पा. ११७६.

“ पहिल्यानें उच्चनीच भाव मुळींच नसतां ब्राह्मणांची जर त्यांच्या गुणावरून ज्ञाति बांधली असेल, तर त्यांनीं आपलें प्रस्थ माजवलें असें म्हणण्यास जागा कोठें राहिली ”— किता, पा. ११७९.

...... “ चवथा जो मंद बुद्धि शूद्र वर्ण ......”— किता, ११८७. ( जाड ठसा माझा )










अनुक्रमणिका

आपल्या सर्व शक्ती त्या कार्यासाठीं पणास लावण्यास अजून निघाला नाहीं, हें खरोखर लज्जास्पद आहे. आर्थिक नियोजनाच्या प्रश्नावर जसे सर्व लोकशाहीपक्ष कांहीं किमान संकेत पाळण्याचें कबूल करतात तसें लोकशिक्षण, अस्पृश्यता निवारण, अशा पक्षीय राजकारणाच्या पलीकडे परंतु लोकशाहीच्या राजकारणासाठीं अद्वितीय महत्त्वाच्या प्रश्नावर त्यांनीं सहकार्य कां करूं नये ? आणि असें होत नाहीं तोपर्यंत मागासलेल्या जातींच्या संघटनांवर दोषारोष करणें कितपत योग्य होईल ?

---











अनुक्रमणिका

श्री. म. ह. दाते

# नासदीय सूक्त : ५ :

" अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।
तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ।। "

अन्य विषयाचे ठिकाणीं ज्याचें चित्त नाहीं, असा जो योगी पुरुष सर्वदा म्हणजे यावज्जीव मज परमेश्वराचें नित्यशः स्मरण करितो, त्या नित्ययुक्त योग्याला, हे पार्था, मी अनायासानें प्राप्त होणारा आहे.

नासदीय सूक्तावरील हा शेवटला लेख आहे. ह्यांत नासदीय सूक्तांतील शेवटल्या चार ऋचांचा विचार करावयाचा आहे.

**ऋचा ६.**

' को अद्धा वेद क इह प्रवोचत
कुत आजाता कुत इयं विसृष्टिः ।
अर्वाग् देवा अस्य विसर्जनेना–
थ को वेद यत आबभूव ॥ ६ ॥ '

**लो. टिळकः**— सताचा हा विसर्ग म्हणजे पसारा कशापासून किंवा कोठून आला हें (यापेक्षां) प्र म्हणजे विस्तारानें येथें कोण सांगणार ? कोण निश्चयात्मक जाणतो. देवहि या (सत् सृष्टीच्या) विसर्गानंतरचे, मग ती जेथून निघाली तें कोण जाणणार ?

**श्रीशंकराचार्य**— ' को अद्धा ' ही ह्या सूक्तांतील सहावी ऋचा होय. ह्या सृष्टीसंबंधानें कांहीं लोक आगम प्रमाणाची पर्वा न करतां आपआपल्या बुद्धीच्या जोरावर वेगळया वेगळया कल्पना लढवीत असतात. उदाहरणार्थः— काणाद, गौतम इत्यादि ' परमाणूच ' जगताचें मूळ कारण असें मानीत असतात. स्वतंत्र व अचेतन असें प्रधान जगताचें मूळ कारण होय असें कपिल प्रभृतींचें मत आहे. ' शून्यापासून जगताची उत्पत्ति होत असते ' असें माध्यमिक समजत असतात. आणि ' जगताला कारणच नाहीं, तें आपोआप उत्पन्न होत असतें, ' असें लोकायतिक समजत असतात; परंतु हे सर्वहि भ्रांतिग्रस्तच आहेत. कारण जगताचें कारण कोणता बरें पुरुष प्रत्यक्ष जाणीत आहे ? आणि स्वतः पाहिल्याशिवाय जगताचें कारण अशा प्रकारचें आहे म्हणून सांगण्यास तरी कोणता बरें पुरुष समर्थ होणार आहे ? ह्या सृष्टीसंबंधानें सांगतां येण्यासारखें आहे तरी काय ? म्हणून विचाराल तर सांगतो. नाना प्रकारची सृष्टि कोठून उत्पन्न झाली, म्हणजे कोणत्या उपादान कारणापासून ही सर्वस्वी उत्पन्न झाली ? आणि त्याचप्रमाणें कोणत्या निमित्त कारणामुळें ही उत्पन्न झाली ? असे प्रश्न कोणी केल्यास जगताचें अमुक अमुक उपादान कारण व अमुक अमुक निमित्त कारण हें अवश्य सांगितलें पाहिजे; परंतु हें सांगतां येणें अशक्य आहे. ही अशक्यता कां ? म्हणून विचाराल तर सांगतों. जगताचें उपादान कारण व निमित्त कारण सांगणारा तरी कोण ? हें कां देवांना सांगतां येणार ? किंवा एखाद्या मनुष्याला सांगतां येणार आहे ? देवांना सांगतां येईल म्हणावें तर ते सांगण्यास समर्थ नाहींत; कारण ते ह्या जगताच्या उत्पत्तीनंतरचेच आहेत. सृष्टीच्या पूर्वी ते नव्हते. ज्या अर्थी देवांची ही गति अशाप्रकारची आहे त्याअर्थी ज्याच्यापासून जगत् उत्पन्न झालें तें कारण अमुक अमुक म्हणून कोणाला-बरें सांगतां येणार आहे ? देव आणि मनुष्य सृष्टीची पूर्वावस्था प्रत्यक्ष अवलोकन करीत असतात म्हणावें, तर तसें म्हणतां येत नाहीं; कारण सृष्टीच्या पूर्वी त्यांचाच स्वतःचा अभाव होता. बरें ! सृष्टीची पूर्वावस्था








अनुक्रमणिका

अमुक अमुक प्रकारची होती असें अनुमानावरून जाणण्यासहि ते समर्थ नाहींत. कारण त्याला योग्य हेतु व दृष्टान्त ह्यांचा अभाव आहे. तस्मात् ‘अतिगंभीर असलेलें हें परमार्थ तत्त्व’ केवल श्रुतीवरूनच समजणारें आहे हा ह्या ऋचेंतील अभिप्राय आहे.

**ऋचा ७.**

‘ इयं विसृष्टिर्यत आबभूव
यदि वा दधे यदि वा न ।
यो अस्याध्यक्षः परमेव्योमन्
सो अङ्ग वेद यदि वा न वेद ॥ ७ ॥ ’

**लो. टिळकः—** हा विसर्ग म्हणजे पसारा जेयून झाला, किंवा तो निर्मिला गेला अगर न गेला, तें, परम आकाशांत असणारा या जगाचा जो अध्यक्ष ( हिरण्यगर्भ ) तो जाणीत असेल किंवा नसेलहि ! ( कोणी सांगावें ? ).

**श्रीशंकराचार्यः—** ‘ इयं विसृष्टिः ’ ही ह्या सूक्तांतील सातवी ऋचा होय. ही दृष्टोत्पत्तीस येत असलेली नाना प्रकारची भूतभौतिकरूप सृष्टि ज्या उपादान कारणापासून सर्वस्वी उत्पन्न झाली तें उपादान कारण कांहीं स्वरूप धारण करून राहिलेलें आहे किंवा त्याला स्वरूपच नाहीं ? हा निर्णय ह्या जगताचा अधिपति जो परमेश्वर तोच कदाचित् जाणीत असेल किंवा तोहि जाणीत नसेल. सत्ता चालविणारा, ज्याच्यावर चालवावयाची ते, इत्यादि भेद व्यवहारामध्यें आहेत. तेव्हां या लौकिक व्यवहार दृष्टीनें तो जाणत असेल असें म्हटलें आहे. आणि ‘ ज्या ठिकाणीं सर्वच कांहीं आत्माच बनून गेलें, त्या ठिकाणीं कशाच्या योगानें कोण कोणाला पाहणार ? ’ इत्यादि श्रुतिप्रमाणें असलेला जी सर्व व्यवहारांतील परमार्थ दृष्टि, त्या दृष्टीनें विचार केला असतां, तोहि जाणीत नसेल, असें म्हटलें आहे. तस्मात् मनुष्यादिकामध्यें तें सृष्टिविषयक ज्ञान आहे, किंवा नाहीं, ही शंका उपस्थित होण्याचें कारण नाहीं.

**ऋचा ८.**

‘ किं ऽस्विद्वनं क उ स वृक्ष आसीत्
यतो द्यावा पृथिवी निष्टतक्षुः ।
मनीषिणो मनसा पृच्छते दुतत्
यदध्यतिष्ठद्भुवनानि धारयन्निति ॥ ८ ॥’

**लो. टिळक**

( सारांश ) घराचा दृष्टान्त घेऊन मूळ एका निर्गुणापासून डोळयास प्रत्यक्ष दिसणारी आकाश पृथ्वीची ही भव्य इमारत घडण्यास लाकूड ( मूल प्रकृति ) कोठून आणिलें ? अशी व्यावहारिक भाषा स्वीकारूनच ऋग्वेदसंहितेंत प्रश्न केला आहे.

**श्रीशंकराचार्य :—** ‘ किं ऽस्विद्वनं ’ ही आठवी ऋचा होय. जगतामध्यें एखाद्या पुरुषाला घर बांधावयाचें असल्यास तो वनामध्यें जातो, तेथें कांहीं वृक्ष तोडितो, आणि त्याच्या काष्ठांनीं आपलें घर बांधतो. तो दृष्टान्त घेऊन या ठिकाणीं उत्प्रेक्षा आहे. ज्या वनांतील वृक्षापासून भूलोक व स्वर्गलोक लाकडें तासून केले असतील, तें वन तरी कोणतें असावें ? आणि तशा प्रकारचा तो वृक्ष तरी कोणता असावा ? ह्या दोन गोष्टींचा विचार, हे बुद्धिमान् जनहो तुम्ही आपल्या स्वतःच्या मनाशीं करा आणि आचार्यासमीप जाऊनहि तुम्ही हे प्रश्न विचारा. त्याचप्रमाणें सर्व लोक स्वतःचे ठिकाणीं धारण करणाऱ्या ज्या कारणरूप वस्तूनें जगताचें नियमन केलें आहे ती वस्तु कोणती हेंहि तुम्ही विचारा.

**ऋचा ९.**

‘ ब्रह्मवनं ब्रह्म स वृक्ष आसीत्
यतो द्यावा पृथिवी निष्टतक्षुः ।
मनीषिणो मनसा विब्रवीमिवः
ब्रह्माध्यतिष्ठद्भुवनानि धारयन् ॥ ९ ॥

**लो. टिळकांनीं** ह्यावर स्वतंत्र अर्थ दिला नाहीं; पण संकलनात्मक रीतीनें ह्या ऋषीचा आशय व त्याची ओळख करून दिली आहे ती अशी :— आपल्या बुद्धीनें ब्रह्मदेवाच्याहि ज्ञानाचा ठाव घेऊं








पाहणारा हा ऋषि आश्चर्यानें अखेर साशंक सांगत आहे. पण एका 'असत्' म्हणजे अव्यक्त व निर्गुण द्रव्यासच विविध नामरूपात्मक सताचा म्हणजे मूळ प्रकृतीचा संबंध कसा जडला हें कळत नसलें, तरी मूळ ब्रह्म एकच आहे, ही आपली अद्वैत बुद्धि तो ढळूं देत नाहीं. अचिंत्य वस्तूच्या गहन रानांत मनुष्याची बुद्धि सात्विक श्रद्धेच्या व निर्मल प्रतिभेच्या जोरावर सिंहाप्रमाणें निर्भयपणें संचार करून त्यांतील अतर्क्य गोष्टी यथाशक्ति कशा निश्चित करीत असत्ये याचें हें उत्कृष्ट उदाहरण असून, ऋग्वेदांत हें सूक्त आढळून येतें हें खरोखरीच आश्चर्य होय.

**श्रीशंकराचार्य –**

'ब्रह्मवनं' ही या सूक्तांतील नववी ऋचा होय. बुद्धिमान लोकांनीं केलेल्या तीन प्रश्नांचें उत्तर ह्या ऋचेमध्यें आचार्यांनीं दिलें आहे. ज्या वनांतील वृक्षापासून भूलोक व स्वर्गलोक हें निर्माण केलें तें वन व तो वृक्ष ब्रह्मच होय. कारण तेंच सर्व शक्तींनीं युक्त आहे. ज्या उत्पाद्य वस्तूला ज्या सामग्रीची अपेक्षा आहे, ती सर्वहि सामग्री त्या ब्रह्माचे ठिकाणीं आहे; आणि तेंच ब्रह्म सर्व जगतें स्वतःचें ठिकाणीं धारण करीत असून त्याचें नियमन करीत आहे. हे बुद्धिमान जनहो ह्याचा मनाने पक्का निश्चय करून मी आचार्य हें तुम्हाला अनेक प्रकारचें उत्तर सांगत आहे.

**कोडें कसें उलगडतें –**

श्रुति, श्रीमद्भगवद्गीता व संतवचनांच्या आधारें या ऋचांचा विचार करूं:

हें जगत् कोठें उत्पन्न झालें, व कशापासून झालें, हें निश्चित रीतीनें कोणता मनुष्य सांगू शकेल ? व याला जाणणारा तरी कोण आहे ? देव जाणीत असतील असें म्हणावें तर ते जाणण्यास समर्थ नाहीत. कारण ते जगताच्या उत्पत्तिनंतरचे आहेत. हा जगताचा पसारा जिथें उत्पन्न झाला, अगर न झाला, याचा निर्णय ह्या जगताचा जो अधिपति, परम आकाशांत स्थित आहे, तोच कदाचित् जाणीत असेल किंवा नसेलहि. त्याचप्रमाणें हें ब्रह्मांड ज्या साधनांनीं बनविलें असेल तो वृक्ष कोणत्या वनांतील असला पाहिजे व त्या वृक्षाचें नांव काय ? वगैरे प्रश्न ६–७–८ या ऋचांत केले आहेत. सकृद्दर्शनी हे प्रश्न अवघड वाटतात; पण ह्यांत इतकें घाबरण्याचें कारण नाहीं. ह्या अवघड वाटणाऱ्या कोड्यांचा उलगडा ऋचा ८–९ यांत स्पष्ट रीतीनें केला आहे. जोंपर्यंत विषयेच्छा आहे, भोगामध्यें आसक्ति आहे, तोंपर्यंत ह्या कोड्यांचा उलगडा होणें शक्य नाहीं. मग ते देव असोत, महर्षि असोत, ब्रह्मलोक गाठलेले असोत किंवा स्वतः ब्रह्मदेव असो." ब्रह्मदेव झाला म्हणून काय झालें, तो तरी सृष्टच आहे. ह्या कोड्याचें उत्तर आठव्या व नवव्या ऋचांत ह्या ब्रह्मदेवाच्या पित्याचा ठाव घेणाऱ्या ऋषीनें (आचार्यानें) स्पष्ट शब्दांत दिलें आहे. तें उत्तर असें– ज्यांची भोगासक्ति सुटून, जे मनीषि झाले, किंवा श्रीज्ञानेश्वरांच्या शब्दांत जे **'चलित चित्तमानतुंदिल'** असतील, त्यांना सद्गुरुकृपेनें ह्या कोड्यांचा उलगडा होऊं शकतो. नुसता स्वतः पुरताच उलगडा होतो असें नव्हें तर सद्गुरुपेनें आपला अनुभव ते स्पष्ट शब्दांत सांगू शकतात व त्याप्रमाणें ह्या सूक्ताच्या आचार्यानें आपल्या नवव्या ऋचेंत सांगितला आहे.

**स्वानुभवी उलगडा –**

हें ब्रह्मतत्त्व किंवा स्वानुभव कसा सांगावा लागतो, व तो ह्या आचार्याने कशा रीतीनें सांगितला आहे. ह्याचा उलगडा करूं:

'मनीषिणो मनसा विब्रवीमि वः
ब्रह्माध्यतिष्ठद्भुवनानि धारयन् ॥'

या ठिकाणीं या आचार्यानें 'विब्रवीमि' असा शब्द वापरला आहे. तो सहेतुक आहे. नुसता 'ब्रवीमि' असा न वापरतां 'वि-ब्रवीमि' असा शब्द वापरण्यांत एक मोठी खोंच आहे.










अनुक्रमणिका

**निग्रहस्थानीचें उत्तर –**

बृहदारण्यकांत असाच एक प्रसंग आला आहे. तो असा-गार्गी याज्ञवल्क्याला दोन प्रश्न करते:– याज्ञवल्क्य ! आकाश कशांत ओत प्रोत आहे. ( कस्मिन्नु खल्वाकाश ओतश्च प्रोतश्चेति ) हा दुसरा प्रश्न आहे. तिची समजूत अशी कीं कालत्रयांतीत आकाशच अगोदर दुर्ज्ञेय आहे. मग ज्यांत तें ओत प्रोत आहे त्या अक्षराच्या अत्यंत दुर्ज्ञेयत्वाविषयीं काय सांगावें ? अर्थात् तें अवाच्य आहे. त्यामुळें अनुभवाचा विषय होत नाहीं. तेंच अवाच्य असलेलें अक्षर जर हा सांगेल, तर तेंच विपरीत ज्ञान होईल, व आपणास अज्ञान त्याच्या पदरांत सहज बांधतां येऊन त्याला पराभूत करतां येईल. कारण तिच्या दृष्टीनें व तार्किकांच्या दृष्टीनें तें निग्रहस्थान आहे म्हणून हा प्रश्न निरुत्तर करणारा आहे अशी तिची समजूत. परंतु ह्या निरुत्तर करणाऱ्या प्रश्नाचें उत्तर फार मार्मिकतेनें याज्ञवल्क्यानें दिलें आहे. आकाश कशांत ओतप्रोत आहे हें याज्ञवल्क्य जाणीत होता कारण तो ब्रह्मनिष्ठ होता. पण मी स्वतः जाणून तुला उत्तर सांगतो असें म्हणावें तर अहंकार पदरीं येतो; व अहंकार हा अज्ञानाचें मूळ आहे. ‘ यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः । ’ अशी श्रुति आहे. ‘ मी ब्रह्म जाणलें ’ असें जो म्हणतो त्याला ब्रह्म मुळींच कळलेलें नसतें, कारण अहं गंडानें तो पछाडला असल्यामुळें ब्रह्मवस्तु त्याला सदाच अज्ञात असते. म्हणून तें ब्रह्मनिष्ठांचा अनुभव पुढें करून सांगावें लागतें.

याज्ञवल्क्य गार्गीला उत्तर देतात, हे गार्गि ! ज्यांत आकाश ओतप्रोत आहे त्या तत्त्वाला ब्रह्मवेत्ते ‘ अक्षर ’ असें म्हणतात. ( सहोवाचैतद्वै तदक्षरं गार्गि ब्राह्मण अभिवदन्ति ) तसाच प्रकार या सूक्ताचा ऋषि परमेष्ठी नामक प्रजापती यानें केला आहे. ‘ विब्रवीमि ’ म्हणजे विशेष प्रकारानें ज्यांनी जाणलें आहे असे जे विशिष्ट ब्रम्हनिष्ठ ते जें सांगतात तेंच मी तुम्हाला सांगत आहे. असा त्या ‘ विब्रवीमि’चा अर्थ करावा किंवा श्रीतुकारामांच्या उक्तिप्रमाणें –

करितो कवित्व म्हणाल हे कोणी ।
नव्हे माझी वाणी पदरीची ॥ १ ॥
माझिया युक्तीचा नव्हे हा प्रकार ।
मज विश्वंभर बोलवितो ॥ २ ॥
काय मी पामरें जाणे अर्थभेद ।
वदवी गोविंद तेंचि वदे ॥ ३ ॥
निमित्त मापासी बैसविलो आहे ।
मी तो कांहीं नव्हे स्वामी सत्ता ॥ ४ ॥
तुका म्हणे आहे पाईकचि खरा ।
वागवितो मुद्रा नामाची हे ॥ ५ ॥
आपुलीया बळें नाहीं बोलवत ।
सखा कृपावंत वाचा त्याची ॥
कायम्या पामरें बोलावीं उत्तरें ।
परि त्या विश्वंभरें बोलविलीं ॥

मी जें तुम्हाला निश्चयात्मक उत्तर सांगत आहे त्याचा ‘ बोलविता धनी वेगळाच आहे ’ असाहि त्या ‘ विब्रवीमि’चा अर्थ करतां येईल.

मी तुम्हाला आपल्या मनाचा पक्का निश्चय करून सांगत आहे असें म्हणण्यांत ‘ जो मी जाणलें म्हणतो त्याला खात्रीनें कांहीं कळलेलें नसतें ’ या श्रुतीशीं विरोध येतो. अनुभव तर सांगावयाचा पण श्रुतिवचनाशी विरोध येतां कामा नये अशा पेंचांतून सुटण्यास असें ‘ **आडूनच** ’ सांगावें लागतें. **श्री ज्ञानेश्वर महाराज** सुद्धां आपले सद्गुरु निवृत्तिनाथ यांच्या कृपा प्रसादाचा आश्रय घेऊनच बोलतात:–

‘ ते बुद्धीहि आकळिता साकडे ।
म्हणऊनि बोली विपाये सांपडे
परि श्रीनिवृत्तिकृपादीप उजियेडे । देखेन मी ॥







जे दिठीहि न पविजे ।
तें दिठीवीण देखिजे ।
जरी अतींद्रिय लाहिजे । ज्ञानबळ ॥
तैसी सद्गुरु कृपा होये ।
तरी करितां काय आपुनोहे ।
म्हणऊनि ते अपार माते आहे । ज्ञानदेव म्हणे ॥
तेणें कारणें मीं बोलेन ।
बोली अरुपाचें रूप दावीन ॥
अतींद्रिय परी भोगवीन । इंद्रिया करवीं ॥
' इयं विसृष्टिर्यत आबभूव ।
यदि वा दधे यदि वा न ।
यो अस्याध्यक्षः परमेव्योमन् ।
सो अङ्ग वेद यदि वा न वेद ॥ '

ह्या ऋचेंत या सूक्तांच्या आचार्यानें एका गूढ तत्त्वाचा उलगडा केला आहे.

**अध्यक्ष भगवानच –**

या ठिकाणीं ' यो अस्याध्यक्षः परमेव्योमन् ' असें म्हटलें आहे, तें **भगवानाना–परमात्म्याला–** उद्देशून म्हटलें आहे. येथें ब्रह्मदेव किंवा हिरण्यगर्भ विविक्षित नाहीं. कारण ' अर्वाग्देवा अस्य विसर्जनेन ' असें म्हटलें आहे. त्या देवांमध्यें ब्रह्मदेवहि पण आला असलाच पाहिजे. कारण तो तरी सृष्टच आहे. ' सो अङ्ग वेद यदि वा न वेद ' याचा आपण विचार करूं. **जाणीव नेणीवरहित जी जाणीव** ती भगवंताचे ठिकाणीं असल्यामुळें असें म्हणणें भाग आहे. भगवानांनीं **गीतेंत** अर्जुनाला विभूति सांगतांना–

' हन्त ते कथयिष्यामि दिव्याह्यात्मविभूतयः ।
प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यन्तो विस्तरस्य मे ॥
गीता, १०–१९.

हे कुरुश्रेष्ठा ! मी तुला मुख्य मुख्य विभूति कथन करतों, कारण माझ्या विभूतींच्या विस्ताराचा अंत नाहीं. ह्या भगवंताच्या श्लोकावर श्रीज्ञानेश्वर म्हणतात :–

तरि तुवा पुसलिया विभूती ।
तयाचे अपारपण सुभद्रापति ।
जे माझियाचि परी माझिये मती । आकळतीना ॥
अंगाचिया रोमा किती ।
जयाचिया तयासि न गणवती ।
तैसिया माझिया विभूती । असंख्य मज ॥
येऱ्हवीं तरी मी कैसा केवढा ।
म्हणोनि आपणपयाही नव्हेचि फुडा ।
यालागीं प्रधानाचिया नामी रुढा ।
तिया विभूती आइके ॥

' सो अङ्गवेद ' म्हणजे स्वसंवेद्य जें आत्मरुप, ज्याच्यावर या विश्वपसाऱ्याची लीला होते आहे तें, साक्षी अवस्थेंत जाणीत असेल, असें म्हटलें आहे. पण जिथें सर्वच आत्मा झालें, जेथें पाहण्याचा विषयच उरला नाहीं, म्हणजे स्वसंवेद्य आत्मरूपच परमात्म्यामध्यें विलीन झालें, सर्वच आत्मा झालें, त्या ठिकाणीं कोणी कोणाला जाणावयाचें, कोणी कोणाला पाहावयाचें ? जाणण्याला किंवा पाहण्याला दुसरें लागतें. दृश्यच द्रष्टा झालें, ज्ञेयच ज्ञान झालें तेथें पाहणारा, वेगळा कोण उरला किंवा जाणण्यास तरी शिल्लक काय राहिलें म्हणून ' यदि वा न वेद ' असें म्हटलें आहे.

' यत्रहि द्वैतमिव भवति तदितर इतरं पश्यति ।
यत्रत्वस्य सर्वमात्मैवाभूत तत्र केन कं पश्येत् ॥
श्रुति ॥ कठ.

जोंपर्यंत द्वैत आहे तोंपर्यंत एक दुसऱ्याला पाहतो; पण ज्या वेळेस सर्वच ' आत्मा ' होऊन जातो, त्या वेळेस कोण कोणाला पाहणार ? पाहणेंच पाहणारा झाल्यावर पाहण्यास उरेल काय ? अर्थात् कांहीं नाहीं.

विशेषाच्यानि नांवे । आत्मत्वहि न साहे ।
किंबहुना न व्हावे । कोन्हीच यया ॥
––अमृतानुभव

आपल्या स्वरूपास दोनपणाच्या कल्पनेचा स्पर्श होऊं नये म्हणून तत्सापेक्ष जो एकपणा तोहि







जेथे उरूं देत नाहीं, अशी वस्तुस्थिति असल्यामुळें तो जाणीत नसेलहि, असें म्हणणें भाग आहे. कारण–

'आपणाप्रती रवी । उदो न करी जेवी ॥ किंवा–
कां समोरपण आपुले । न लाहिजे कांहीं केले ॥

त्याप्रमाणें आपलें आपणास कसें जाणावें ? किंवा–

'नव्हे आत्मया आत्मप्रवृत्ति । मा वाढविता के निवृत्ति ।
परि या नामाची वाय बुथी । सांडिचिना ॥
निवर्ते तव नाहीं । मा निवर्तवी हा काई ।
तरि कैसा वैसे ठाई । निवृत्तिनामाच्या ॥
परी सूर्यासी अंधकारु । कैं जाला होता गोचरू ।
तऱ्ही तमारी हा डगरू । आलाचि कीं ॥ -अमृतानुभव.

'गुकारस्त्वन्धकारस्यात् रुकारस्तन्निवर्तकः' या वसिष्ठ वचनाप्रमाणें प्रवृत्तिरूपीं अंधकार कोठें असो वा नसो; व सद्‌गुरु हे त्याचें निवर्तन करोत वा न करोत, लोक जसें सूर्याला तमारि, तसें श्रीनिवृत्तिनाथांना श्रीनिवृत्तिनाथ म्हणणार. त्याचप्रमाणें ह्या ऋचेंत हा विसर्ग म्हणजे पसारा जेथून झाला, अगर न झाला, तो 'यो अस्याध्यक्षः परमेव्योमन्' स्वतः 'अध्यक्ष' असून जाणीत असेल किंवा नसेलहि, अशीच भाषा वापरण्याशिवाय गत्यंतर नाहीं.

'लटिके येणें रुढे । जड येणे उजिवडे ।
न घडे तेहि घडे । याचिया मावा ॥
हा गां मायावशेदाविसी ।
ते माइक म्हणोन वाळिसी ।
अमाइक तव नव्हसी । कवणाहि विषो ॥
सिव सिवा सद्‌गुरू । तुजला गूढा काये करू ।
एकाहि निर्धारा धिरू । देतासिका ॥ -अमृतानुभव

'यत्र नान्यत्पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानाति स भूमा' अशी श्रुति असल्यामुळें 'सो अङ्गवेद यदि वा न वेद' असें म्हटलें आहे.

'नाहं मन्ये सुवेदेति नो न वेदेति वेद च ।
योनस्तद्वेद तद्वेद नो न वेदेति वेद च ॥ केन० ॥

याचा भावार्थ असा– मी त्याला जाणीत नाहीं असेंहि नाहीं व मी त्याला जाणतो असेंहि नाही, 'जाणीव नेणीव नाहीं भगवंती' या श्रीज्ञानेश्वरांच्या म्हणण्याप्रमाणें अथवा 'जाणीवा जाणपण । नेणीवा नेणपण । दोहींच्या विंदानें । सहजाचें दर्शन ॥' ह्या श्री एकनाथ महाराजांच्या उक्तीप्रमाणें जाणीव नेणीव विरहित जें जाणपण त्या अर्थानें अस्ति नास्ति भाषा वापरून भगवंताचा महिमा या आचार्यांनीं प्रकट केला आहे. भगवान जाणीत असतील असें म्हणावें तर भगवंताचे ठिकाणीं अहंकाराचा दोष येतो व जाणीत नाहीं म्हणावें तर तो 'अध्यक्ष' आहे. ह्या दुहेरी पेचांतून सुटण्यास 'तो जाणीत असेल किंवा जाणीत नसेल' हीच भाषा वापरणें योग्य आहे.

अहो ऐक्याचे मुद्दल न ढळे ।
वरी साजिरेपणाचा लाभु मिळे ।
तरी स्वतरंगाची मुकुळे ।
तुरंबु का पाणि ॥ —अमृता. श्री ज्ञानेश्वर.
येथें प्रवृत्ति बहुडे जिणें ।
अप्रवृत्तीसी वाधावणें ।
आतां प्रत्यङ्मुखपणें ।
प्रचारू दिसे । — अमृता. श्री ज्ञानेश्वर.

अर्थ:– येथें प्रवृत्तिमार्ग लय पावून निवृत्तिमार्ग सुरू होतो, आणि आत्माभिमुख होवूनच सर्व गोष्टी घडत असतात. किंवा झोपेंचें सुख न मोडतां जसे स्वप्नाचे देखावे पाहावयास सांपडतात त्याप्रमाणें स्वस्वरूपामध्यें जगत् विलासहि पाहावयास मिळतो व आत्मस्थितीचाहि भंग होत नाहीं अशा या दोन अवस्थांचें एकीकरण मोठ्या मार्मिकतेनें या आचार्यांनें समजावून दिलें आहे.

**मनीषि कोण ?**

'किंस्विद्वनं क उ स वृक्ष आसीत् । यतो द्यावा पृथिवी निष्टतक्षुः । मनीषिणो मनसा पृच्छते दुतत् । यदध्यतिष्ठद्भुवनानि धारयन्निति ॥' या ऋचेंत 'मनीषि' हा शब्द वापरला आहे. त्याचा आपण विचार करूं.– ज्याला विषयेच्छा नाहीं,







भोगासक्ति नाहीं, ज्याचा स्वतःवर पूर्ण ताबा आहे त्यास ' मनीषि ' म्हणतात. मनीषि झाल्याशिवाय सद्गुरु भेटत नाहींत व सद्गुरु कृपेशिवाय आत्मानुभव होणें शक्य नाहीं.

'अविद्यायामन्तरे वर्तमानाः
स्वयं धीराः पण्डितंमन्यमानाः ।
दन्द्रम्यमाणाः परियन्ति मूढा
अन्धेनैव नीयमाना यथान्धाः ॥

ज्यांच्या लोकेषणा, पुत्रेषणा, व वित्तेषणा सुटलेल्या नाहींत म्हणजे जे विषयेच्छु व भोगासक्त असतात, असे मूर्खलोक स्वतःला विद्वान व बुद्धिमान समजून विद्या व बुद्धीच्या अभिमानानें शास्त्रवचनांची व महापुरुषांच्या वचनांची अवहेलना करतात. 'लोका सांगे ब्रह्मज्ञान व स्वतः कोरडे पाषाण ' अशा मूर्ख लोकांचा, आंधळ्यांनी आंधळ्याला मार्गदर्शन केल्यामुळें जसा फजीतवाडा होतो, त्याप्रमाणें हे स्वतःहि खड्यांत पडतात व दुसऱ्यासहि खड्यांत पाडतात.

अंधळ्याचे काठी लागले अंधळे ।
घात एका वेळें पुढें मागे ॥ — श्रीतुकाराम

' न साम्परायः प्रतिभाति बालं
प्रमाद्यन्तं वित्तमोहेन मूढम् ।
अयं लोको नास्ति पर इति मानी
पुनः पुनर्वशमापद्यते मे ॥ . '

संपत्तीच्या मोहानें मोहित, निरंतर प्रमाद करणारा, परलोक वगैरे कांहीं आहे असें न मानणारा, प्रत्यक्ष दिसणारा हा लोकच सत्य आहे, स्वर्ग नरकादिक वगैरे सर्व खोटे, असा जो समजतो, तो मूर्ख वारंवार यमराजाच्या तडाख्यांत सांपडतो.

' श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः
शृण्वन्तोऽपि बहवो यं न विद्युः ।
आश्चर्यो वक्ता कुशलोऽस्यलब्धा-
ऽऽश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्टः ॥ '

जें आत्मतत्त्व बहुतेकांना ऐकण्यास मिळत नाहीं, ज्याला पुष्कळ लोक ऐकूनहि समजू शकत नाहींत; अशा गूढ आत्मतत्त्वाचें निरूपण करणारा महापुरुष, आश्चर्यवत्, एकादाच असतो. त्याचप्रमाणें आत्मतत्त्वाचा अनुभवी देखील दुर्लभ. व अशा आत्मज्ञानी महापुरुषाकडून एकाद्यालाच त्याच्या उपदेशाचा लाभ मिळाल्यास आश्चर्यच म्हणावयाचें ! आत्मतत्त्वाचा लाभ होणें किती दुर्लभ आहे हें ह्यांत यमानें नचिकेताला सांगितलें आहे. जगामध्यें अधिकांश माणसें अशीं असतात कीं ज्यांना आत्मकल्याणाची चर्चा ऐकण्यासहि मिळत नाहीं, त्यांच्या भोंवतालचें वातावरण अशा तऱ्हेचें असतें कीं सकाळपासून रात्रीं निजेपर्यंत केवळ विषयांच्या चर्चेशिवाय दुसरी गोष्टच नाहीं; व त्यामुळें त्यांचें चित्त आठहि प्रहर विषयचिंतनांत मग्न असतें. त्यांना स्वतःस आत्मतत्त्व समजावून घेण्याची इच्छाच उत्पन्न होत नाहीं. चुकून जर आत्मतत्त्वाच्या श्रवणाचा योग आला, तर त्यांना विषयसेवनामुळें वेळच मिळत नाहीं. कांहीं लोकांना श्रवणाची व ते समजावून घेण्याची इच्छा असल्यामुळें ते श्रवण करतात; परंतु त्यांचें मन विषयाभिभूत असल्यामुळें ऐकलेलें त्यांच्या मनांत ठसत नाहीं किंबहुना मंदबुद्धीमुळें श्रवण केलेल्याचें बरोबर आकलन होत नाहीं. त्यांच्यांतील जे तीक्ष्ण बुद्धीचे लोक असतात त्यांना समजतें; पण दुसऱ्यास समजावून सांगतां येत नाहीं व स्वतःलाहि समजलेलें उमजत नाहीं. क्वचित् असे आश्चर्यवत् पुरुष असतात कीं समजलेल्या आत्मतत्त्वाचें ते उत्तम रीतीनें विवरण करूं शकतात व आत्मतत्त्वप्राप्तीमुळें ते कृतार्थ होतात. अशा महापुरुषाचा लाभ एकाद्यालाच क्वचित होतो. एकूण विषयासक्तिमुळें हें आत्मतत्त्व अत्यंत दुर्लभ आहे.

' न नरेणावरेण प्रोक्त एष
सुविज्ञेयो बहुधा चिन्त्यमानः ।
अनन्यप्रोक्ते गतिरत्र नास्ति
अणीयान् ह्यतर्क्यमणुप्रमाणात् ' ॥








अल्पज्ञ मनुष्याकडून हें आत्मतत्त्व समजणें शक्य नाहीं. ( दासबोधांत अशा अल्पज्ञ गुरूंचें वर्णन श्रीरामदास स्वामींनीं सुंदर केलें आहे तें अवश्य पहावें ). ज्ञानी व अनुभवी सद्गुरुवाचून हें आत्मतत्त्व समजणें अत्यंत कठीण आहे; कारण हें अत्यंत सूक्ष्म व अतर्क्य आहे. वाटेल त्याला सद्गुरू बोध करीत नाहींत.

' इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।
न चाशूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयती ॥ '

भ. गी. १८–६७

अशी त्याला मर्यादा आहे. श्रीज्ञानेश्वरींत ह्या श्लोकावरील टीका अवश्य वाचण्यासारखी आहे.

' को अद्धावेद क इह प्रवोचत
कुत आजाता कुत इयं विसृष्टिः ॥ ' किंवा
किंँस्विद्वनं क उ स वृक्ष आसीत्
यतो द्यावा पृथिवी निष्टतक्षुः ॥

**प्रश्नांची कारणें––**

अशा तऱ्हेचे प्रश्न ह्या आचार्यांनी कां करावेत? तर त्याला कारणेंहि तशींच आहेत.

**श्रीतुकाराम :–**

१ अज्ञानाची भक्ति इच्छिती संपत्ती ।
तयाचिया चित्तीं बोध कैंचा ॥
अज्ञानाची पूजा कामिक भावना ।
तयाचिया ध्याना देव कैंचा ॥
अज्ञानाचें कर्म फळीं ठेवी मन ।
निष्काम साधन तया कैंचें ॥
अज्ञानाचें ज्ञान विषयावरीं ध्यान ।
ब्रह्मसनातन तया कैंचें ॥
तुका म्हणे जळो ऐशियांचें तोंड ।
अज्ञानाचें बंड वाढविती ॥

२ जीव तोचि देव भोजन ते भक्ति ।
मरण ते मुक्ति पाषांड्याची ॥
पिंडाच्या पोषकी नागविले जन ।
लटिके पुराण केले वेद ॥
मना आला तैसा करिती विचार ।
म्हणती संसार नाहीं पुन्हा ॥
तुका म्हणे पाठी उडती यमदंड ।
पापपुण्य लंड विचारिती ॥

**गीता :–**

त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा
यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते ।
ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोकम्
अश्नंति दिव्यान्दिविदेवभोगान् ॥ ९।२०.

**श्री ज्ञानेश्वरः–** देख पां गा किरीटी । आश्रम धर्माचिया राहाटी । विधिं मार्गी कसवटी । जे आपणचि होती ॥ यजन करितां कौतुकें । तिहीं वेदांचा माथा तुके । क्रियाफळेसि उभी ठाके । पुढां जया ॥ ऐसे दीक्षित जे सोमप । जे आपणचि यज्ञाचें स्वरूप । तिहीं तया पुण्याचेनि नांवे पाप । जोडिले देखे ॥ तैसे शतक्रतु यजिलें मातें । कीं ईप्सितातिस्वर्ग सुखातें । आतां पुण्य कीं हे निरुतें । पाप नोहे ॥ म्हणोनि मजवीण पाविजे स्वर्ग । तो अज्ञानाचा पुण्यमार्ग । ज्ञानिये तयांते उपसर्ग- । हानि म्हणती ॥

**गीता–**

ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं
क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति ।
एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना
गतागतं कामकामा लभंते ॥ . ९-२१.

**श्रीज्ञाने० –**

मग तया पुण्याची पाउटी सरे । सवेंचि इंद्रपणाची उटी उतरे । आणि येऊं लागती माघारे । मृत्युलोका ॥ जैसा वेश्याभोगी कवडा वेंचे । मग दारहि चेपूं नये तियेचें । तैसें लाजिरवाणें दीक्षितांचें । काय सांगो ॥ एवं थितिया मातें चुकले । जिहीं पुण्यें स्वर्ग का मिळे । तया अमरपण तें वावो जालें । अंतीं मृत्युलोक ॥ अर्जुना वेदविदजन्ही जाहला । तरी मातें नेणतां वायां





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

गेला। कण सांडूनि उपणिला। कोंडा जैसा ॥ म्हण-वूनि मज एकेविण। हे त्रयीधर्म अकारण। आतां माते जाणोनि, कांही नेण। तूं सुखिया होसी ॥

**गीता—**

सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम।
देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः॥
११:५२

**श्रीज्ञाने०—**

तरि विश्वात्मक रूपडें। जें दाविलें आम्ही तुजपुढे। तें शंभूही परि न जोडे। तपें करितां ॥ आणि अष्टांगादि संकटी। योगी शिणताति किरीटी। परि अवसर नाहीं भेटी। जयाचिये ॥ उत्कंठा निर्भर। होऊनिया सुरवर। घोकीत आठहि पाहर। भेटी जयाची ॥

**गीता—**

नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया।
शक्य एवं विधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥
११:५३.

**श्री ज्ञानेश्वर—**

पैं उपायासि वाटा। न वाहती एथ सुभटा। साही सहित वोहटा। वाइला वेदीं॥ मजविश्वरूपाचिया मोहरा। चालावया धनुर्धरा। तपाचियाही सर्व भारा। नव्हेचि लाग॥ आणि दानादि कीर कानडे। मी यज्ञाहि तैसा न सांपडें। जैसेनि कां सुरवाडे। देखिलासि तुवां॥ तैसा मी एकीचि परी। आतुडे गा अवधारी। जरी भक्ति येऊनि वरी। चित्तातें गा॥

**गीता—**

भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवं विधोऽर्जुन।
ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥. ११:५४

**श्री ज्ञाने०—**

परि तेचि भक्ती ऐसी। पर्जन्याचि सुटिका जैसी। धरा वाचोनि अनारिसी। गतीचि नेणें॥ कां सकल-जलसंपत्ति। घेऊनि समुद्रातें गिंवसिती। गंगा जैसी अनन्यगति। मिनलीच मिळे॥ तैसे सर्वभाव संभारें। न धरत प्रेम एकसरें। मजमाजि संचरे। मीचि होऊनी॥ आणि ते विंचि मी ऐसा। थडिये आणि माझारी सरिसा। क्षीराब्धि कां जैसा। क्षीराचाचि॥ तैसें मजलागुनी मुंगीवरी। किंबहुना चराचरी। भजनासि कां दुसरी। परीचि नाहीं॥ तयाचि क्षणासवें। एवंविध मी जाणावें। जाणितला तरी स्वभावें। दृष्टहि होय॥ मग इंधनीं अग्नि उदीपे। आणि इंधन ही भाष हारपे। तें अग्निचि होऊनि आरोपे। मूर्त जेवीं। कां उदय न कीजे तेजाकारें। तव गगनचि होऊन असे आंधारें। मग उदैलिया एकसरें। प्रकाश होय॥ तैसें माझिये साक्षात्कारी। सरे अहंकाराची वारी। अहंकार लोपी अवधारी। द्वैत जाय॥ मग मी तो हें आघवें। एक मीचि आथि स्वभावें। किंबहुना सामावें। समरसें तो॥ कैवल्याही चढावा। करीत विषयसेवा। झाला भृत्य-भजय-कालोवा। भक्ताच्या घरीं॥ अमृता. श्रीज्ञाने०

**अर्थ—**

विषयांचें सेवन हें कैवल्य स्थितीवरहि ताण करितें व भक्तीच्या घरांमध्यें भक्त व त्याचा देव दोघेहि परस्परांत मिसळून जातात.

**श्रीतुलसीदास—**

भगति सुतंत्र सकल सुखखानी।
बिनु सत संग न पावहिँ प्रानी।
पुष्यपुंज बिनु मिलहिँ न संता।
सत संगति संसृति कर अंता॥ उत्तर कांड.
जाते बेगि द्रवउँ मै भाई।
सोममभगवति भगत-सुखदाई।
सो सुतंत्र अवलंबन आना।
तेहि आधीन ज्ञान विज्ञाना॥ —अरण्यकांड.

**भक्तालाच कळेल.**

हें ब्रह्मवन व हा ब्रह्मवृक्ष भक्त झाल्याशिवाय कळणार नाहीं.











**गीता–**

भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मितत्त्वतः ।
ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम् ॥

**श्रीज्ञाने०**

मी एक वाचूनि कांहीं । तया तयाहि सकट नाहीं । हे चौथी भक्ति पाही । माझी तो लाहे ॥ येर आर्त जिज्ञासु अर्थार्थी । हे भजती जिये पंथी । तिन्ही पावोनि चौथी । म्हणिपत आहे ॥ येन्हवीं तिजी ना चवथी । हे पहिलीना सरती । पै **माझिये सहजस्थिती । भक्तिनाम ॥** इया ज्ञान भक्ति सहज । भक्त एकवटला मज । तो मीचि केवळ हे तुज । श्रुतहि आहे ॥ जे उभऊनिया भुजा । ज्ञानि या तो आत्मा माझा । हें बोलिलों कपिध्वजा । सप्तमाध्यायीं ॥ ते हे कल्पादिभक्तिमिया । श्रीभागवतमिषें ब्रह्मया । उत्तम म्हणोनि धनंजया । उपदेशिली ॥ ज्ञानी इये तें स्वसंविति । शैव म्हणती शक्ति । आम्ही परमभक्ति । आपली म्हणो ॥ तेथें वैराग्य विवेकेसी । आटे बंध मोक्षेसी । वृत्ती तये अवृत्तीसी । बुडोनि जाय ॥ घेऊन ऐलपणाते । परत्व हारपें जेथें । गिळूनि चारीभूतें । आकाशजैसे ॥ तयापरिथडथांद । साध्यसाधनांतीत शुद्ध । ते मी होऊनि एकवद । भोगितो माते ॥ तैसें रूप होऊनि माझे । माते क्रियावीण तो भजे । घनाकार कां सहजे । सोनयाते जेवि ॥ तैसी क्रिया कीर न साहे । तऱ्ही अद्वैती भक्ति आहे । हे अनुभवाचि जोगे । नव्हे बोला ऐसे ॥ .

**श्री तुकाराम–**

भक्ति तो कठिण सुळावरील पोळी ।
निवडे तो बळी विरळा शूर ॥ .

' स्वस्वरूपानु संधानं भक्तिरित्यभिधीयते '

आपल्या शुद्ध स्वरूपाचें सतत स्मरण करणें म्हणजे भक्ति.

**कबीर–**

कबीर बादल प्रेमका, हमपर वर्षा आइ ।
अंतरि भीगी आत्मा, हरीभई बनराइ ।
पूरेसूं परचाभया, सब दुःख मेल्या दूरि ।
निर्मल कीन्ही आतमा, ताथै सदा हजूरि ॥ .

**सद्‌गुरु**

भगवंताची प्राप्ति व्हावी अशी तीव्र जिज्ञासा असल्यास भक्ति हेंच फक्त साधन आहे. व भक्ति कशी करावी हे समजण्यास ' सद्‌गुरू ' पाहिजेत. ' सद्‌गुरु ' शोधावे लागत नाहींत. साधकाची तयारी झाली म्हणजे ' सद्‌गुरु ' आपोआप भेटतात.

**गीता–**

असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।
नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाऽधि गच्छति ॥
१८:४९.

**श्रीज्ञाने०–**

तरि देहादिक हे संसारे । सर्वहि मांडलेसे जे गुंफिरे । तेथनातुडे तो वागुरे । वारा जैसा ॥ पै परिपाकाचिये वेळे । फळ देठें ना देठ फळे । न धरे तैसे स्नेह खुळें । सर्वत्र होय ॥ पुत्र वित्त कलत्र । हे जालियाहि स्वतंत्र । माझे न म्हणे पात्र । विषाचें जैसे ॥ हें असो विषयजाती । बुद्धि पोळली ऐसी माघौंति । पाऊले घेऊनि एकांति । हृदयाच्या रिघे ॥ ऐसया अन्तःकरण । बाह्य येतां तयाची आण । न मोडी समर्था भेण । दासी जैसी ॥ तैसे ऐक्याचिये मुठी । माजिवडे चित्त किरीटी । करूनि वेधीं नेहटी । आत्मयाच्या ॥ तेव्हां दृष्टादृष्ट स्पृहे । निमणें जालेचि आहे । आगी दडपलिया धुये । राहिजे जैसें ॥ म्हणोनि नियमिलिया मानसीं । स्पृहा नासोन जाय आपैसी । किंबहुना तो ऐसी । भूमिका पावे ॥ पै अन्यथा बोध आघवा । मावळोनि तया पांडवा । बोधमात्रींचि जीवा । ठाव होय ॥ धरवणी वेंचें सरे । तैसे भोग प्राचीन पुरे । नवे तंव







नुपकरे । कांहींचि करूं ।। ऐसी कर्मे साम्यदशा । होय तेथ वीरेशा । मग श्रीगुरू-आपैसा । भेटेचिगा ।।

**कबीर –**

साधो, सहज समाधि भली ।।
गुरु प्रताप जा दिनसे उपजी, दिन दिन अधिक चली ।।
उठत बैठत कबहूं न छुटै, ऐसी तारी लागी ।
कहत कबीर यह उनमुनि रहनी, सो परगट करि भाई ।
दुःख सुखसे कोईपरे परमपद, तेहि पद रहा समाई ।।

–ज्या ब्रह्मवनाची व ब्रह्मवृक्षाची माहिती हा परमेष्ठी नामक प्रजापति सांगतो तें वन व तो वृक्ष संतानामुद्धा माहीत आहे इतकेंच नव्हे तर त्याची उत्तम फोड करून ते सांगतात.

श्रीएकनाथ –

'कान्होबा नवल सांगतो गोष्टी । एक वृक्ष दृष्टी देखिला तयावरी सृष्टी ।। १ ।। कोडे रे कोडे कान्होबा तुझें कोडे । जाणती जाणती अर्थ पहाता उघडे ।। ध्रु. ।। वृक्षाग्री नाहीं मूळ वर शेंडा नाहीं सरळ । बावनशाखा पल्लवपत्र पुष्प भरलें सकळ ।।२।। एकाजनार्दनी वृक्ष सुढाळ । तयावरी खेळे एकएकुलतें बाळ ।। ३ ।।

२. वृक्ष व्याला आकाश पाताळ । वृक्षीं प्रसवले लोकपाळ । अठयांशीं सहस्रऋषिमंडळ ।। १ ।। कान्होबा बोलों तुझे कोडे । अर्थ ऐकतां ब्रह्म जोडे । अभक्त होती केवळ वेडे रे ।। २ ।। वृक्षां अंगी पंचभूते । प्रसवला तत्त्वें निरुते । अहं सोहं पाहतां ते होतें ।। ३ ।। एका जनार्दनी पाहिला वृक्ष । गुरुकृपें वोळखिला साक्ष । भेदभाव गेला प्रत्यक्ष रे ।।४।।

३. वृक्ष पाहतां परतला आगम । निगमा नकळे दुर्गम । वेदशास्त्रांसी निरुते वर्म । तो वृक्ष देखिला विठ्ठलनाम ।। १ ।। उघडे माझें कोडे । जाणती न जाणती ते वेडे । पडले विषयांचें सांकडे । तया न कळे हें कोडे रे ।। २ ।। माझें सोपें कोडे । कान्होबा करी तूं निवाडे । अर्थ सखोल ब्रह्मांड भक्तिभाव तयासी उघडे रे ।। ३ ।। साहाची येथें न चालें मती । चार गुंतले न कळे गती । अठरा भाटीव वर्णिती । ऐशियासी न कळे स्थिती रे ।। ४ ।। चौऱ्यांशीं लक्ष भुलले वायां । अठयांशी सहस्र भोगिती छाया । तेहतीस कोटी न कळे आयतया । एका जनार्दनीं लागे पायां रे ।। ५ ।।

– भक्ताचा वचक भगवंताला किती असतो व त्यामुळें तो भक्ताला कसें मुकाट्यानें दर्शन देतो त्याचा मासला पहा:–

**श्रीएकनाथ:–**

'जय गोविंदा परमानंदा ऐक माझे बोल । निर्गुणरूपें असतां तुझे कांहींच नव्हे मोल । मग तूं माया धरूनी अती जाहलासी सबळ । नसतें देवपण अंगीं आणुनी चाळविसी केवळ ।। १ ।। ऐसा लाघवी तूं रामा । नको चाळवूं आम्हा ।। ध्रु०।। नसतां तुज मज भेद देवा लटिके जीवपण देसी । आपुलें ठायीं थोरपण आणुनी आमुची सेवा घेसी । नसती अविद्या पाठीं लावुनी संसारीं गोंविसी । नानाकर्में केली म्हणोनी आम्हा कां दंडिसी ।। २ ।। माते भावें भजिजे ऐसा उपदेश करिसी । आपुल्या भक्तां तारिन म्हणोनि प्रताप बोलसी । निंदक दुर्जन अभक्त त्यातें नरकीं तूं घालिसी । आपुल्या स्वार्था लागुनी दुसरी यातें कां पीडिसी ।। ३ ।। आपुली महिमा वाढो म्हणोनि आम्हा भक्त केले । लक्ष चौऱ्यांशीं योनी देउनी संसारीं गोंविलें । भावें तूं ते न भजो म्हणोनि आकस आरंभिलें । तुज मज वैर देवा ऐसें करितां नव्हे भले ।। ४ ।। ऐसें तुज मज वैर म्हणोनी गुरुसी शरण गेलों । देव भक्तपण कोण्याकर्में मग पुसों लागलो । सद्गुरू म्हणती सर्वहि मायिक निश्चयें बोलिलों । देव आणि भक्त एकचि गोष्टीसी पावलों ।। ५ ।। मग गुरुकृपें करून तुझें गिळीन देवपण । तुझिया नेणों भक्तीवरी घालिन पाषाण जीवशिव दोन्ही मिळोनी मग मी सुखें राहीन । तुज मज रूप न रेखा त्यातें निर्धारीन ।।६।। ऐसें भक्त बोल ऐकुनी देवा थोर उपजली चिंता ।







विवेकबळें करुनि माझें देवपण उडविले आतां।
या लागीं मिणें भक्तजनासी ऐक्य करुनी तत्त्वता।
एकाजनार्दनी दरुशन द्यावे लागेल त्वरिता ॥ ७ ॥.

श्रुति, स्मृति व संत यांचा मागोवा घेत घेत 'नासदीय' सूक्ताच्या अर्थाचा उलगडा हा असा आहे असें माझ्या अल्पमतीस वाटतें म्हणून श्री ज्ञानराज माउलीच्या उक्तीप्रमाणें वाचकास माझी नम्र विनंती अशीः—

'तऱ्ही पुरोहित गुणें। मी बोलिलों पुरे उणें।
तें तुम्ही माऊलीपणें। उपसाहि जो जी ॥

---









श्री. व. गो. सहस्रबुद्धे

# अर्थशास्त्रीय परिभाषा -- एका टिपणाच्या निमित्तानें

नवभारतच्या सप्टेंबरच्या अंकांत सुरेख पंडित यांनी एक सुरेख व पांडित्यदर्शक टिपण लिहून मराठीतील अर्थशास्त्रीय परिभाषेसंबंधीं त्यांना अनागोंदी वाटणाऱ्या कारभाराबद्दल तक्रार केली आहे व महाराष्ट्र साहित्य परिषद, महाराष्ट्रांतील विद्यापीठें, व विद्वानांना अर्थशास्त्राच्या परिभाषेची निश्चिती करावी असें आवाहन केलें आहे. हें टिपण लिहून एका महत्वाच्या प्रश्नाला चालना दिल्याबद्दल पंडितांचें अभिनंदन केलें पाहिजे व आभारहि मानले पाहिजेत.

तथापि पंडितांचें टिपण समग्र वाचल्यानंतर मराठी परिभाषेंतील गोंधळ नाहींसा व्हावा अशी त्यांची प्रामाणिक इच्छा आहे कीं मराठी माध्यमालाच त्यांचा विरोध आहे अशी शंका आल्यावाचून राहात नाहीं. तसें नसेल तर त्यांच्या टिपणांतील पहिला परिच्छेद अप्रस्तुत ठरतो. मातृभाषेचें माध्यम सुरूं करण्याची घाई मराठीप्रधान विद्यापीठानीं केली व शाळेंतून इंग्रजी काढलें ह्याचा पस्ताव महाराष्ट्रीयांना होत आहे आणि दुसरीं विद्यापीठें अद्याप विचार करीत राहिलीं आहेत इत्यादि विधानें पंडितांचें अज्ञान दर्शविणारीं व प्रतिपाद्य विषयाशीं संबंध नसलेलीं आहेत. शाळेतून इंग्रजी काढलें ह्याचा पस्ताव होण्याचीं कारणें अगदीं वेगळीं आहेत. त्यांचा परिभाषेच्या प्रश्नाशीं कांहींएक संबंध नाहीं. बाकी अप्रस्तुत विधानें करण्यांत पंडितांचा हातखंडा दिसतो. नाहींतर ' प्रा. सहस्रबुद्धे तर तळटीपांत सबंधच्या सबंध इंग्रजी अवतरणें, वाक्यें देतात. इतकीं कीं वरील मजकूर त्याचें केवळ भाषांतर वाटावें ' ह्या मजकुराचा परिभाषेच्या प्रश्नाशीं संबंध काय ? माझ्या पुस्तकांतील इंग्रजी अवतरणामुळें मराठी परिभाषेच्या बाबतींत गोंधळ निर्माण झाला आहे कीं काय ? तसेंच मराठींतील अर्थशास्त्रीय लेखक आपले शब्द प्रचारतंत्रीय पद्धतीनें रूढ करूं पहात आहेत असा पंडिताच्या टिप्पणींतील गर्भित आरोप मला संपूर्णपणें अमान्य आहे. प्रचारांत आग्रहीपणा असतो. पण माझ्या माहितीप्रमाणें सर्व मराठी लेखकांनीं परिभाषेच्या बाबतींत अत्यंत अनाग्रही व सध्यांच्या परिस्थितींत अगदीं योग्य अशी भूमिका स्वीकारलेली आहे. ' अर्थशास्त्र परिभाषा ' ह्या ग्रंथाचे लेखक प्रा. श्या. मा. कुलकर्णी ह्यांनी परिभाषेच्या बाबतींत खास श्रम घेतले आहेत. तरीसुद्धां त्यांनीं आपण सुचवलेलेच शब्द योग्य आहेत असा आग्रही दावा केलेला नाहीं. प्रचारतंत्र हा शब्द कोठें वापरावा ह्याचें तंत्रसुद्धां पंडिताना माहित नाहीं असें दिसतें.

परिभाषेच्या प्रश्नाचा आतां अर्थशास्त्रवेत्यांनीं विचार केला पाहिजे, जाणकार विद्वानांनीं स्वतःहून पुढाकार घेतला पाहिजे अशी भाषा वापरून पंडितानीं असा भास निर्माण करण्याचा प्रयत्न केला आहे कीं, अर्थशास्त्रावर सध्यां मराठीतून लेखन करणारे प्राध्यापक त्या विषयांत अनभिज्ञ आहेत. खरी गोष्ट अशी आहे कीं त्या विषयावर सध्यां जे लेखन करतात, त्यांचा त्या विषयाचा पुष्कळ वर्षांचा व्यासंग आहे, इंग्रजीतून त्यांनी त्या विषयाचें अध्ययन व अध्यापन केलेलें असल्यामुळें त्यांचा इंग्रजी भाषेचा व त्या भाषेतील अर्थशास्त्रीय वाङ्मयाचा चांगला परिचय आहे. तेव्हां अर्थाचा विपर्यास त्यांच्याकडून होण्याचा संभव फारच कमी आहे. परिभाषा प्रथम टांकसाळण्यापेक्षां उत्स्फूर्तपणें ती विकसत जावी ही श्री. खेर ह्यांनी काढलेली पळवाट नसून परिभाषा तयार होण्याचा तोच खरा मार्ग आहे. संबंधित विषयाचा परिचय नसणाऱ्या पढीक विद्वानानें परिभाषा तयार केल्यास काय होतें हें रघुवीरी-परिभाषेनें दिसलेंच आहे. पतचलन व रोखचलन हे दोन्ही म्हणजे पैसाच होय. मग पैसा हा साधा शब्द कां वापरत नाहीं असा प्रश्न करण्याइतकें ज्यांचे अर्थशास्त्राचें ज्ञान आहे व उपक्रम म्हणजे Initiative असें म्हणण्याइतकें ज्यांचें इंग्रजी-मराठीचें ज्ञान आहे त्यांच्याकडून परिभाषा कशी तयार होणार ? राम व लक्ष्मण ह्यांचे वडील जर एकच तर त्यांना दोन नांवें कशाला असाहि प्रश्न ही मंडळी विचारावयास कमी करावयाचीं नाहींत. आणि Currency, Credit व Money हे सर्व समानार्थी शब्द असतील तर त्यांतील कोठ











अनुक्रमणिका

लेहि दोन इंग्रजी भाषेंतून काढण्यास तरी हरकत कां असावी ?

मी वापरलेल्या कांहीं शब्दांना पंडितांनी आक्षेप घेतला आहे. परिभाषेबाबत माझी आग्रही वृत्ति नसल्यानें पंडितांच्या प्रत्येक आक्षेपाला उत्तर द्यावयाचा माझा विचार नाहीं. पण ह्या निमित्तानें परिभाषेसंबंधी माझी भूमिका स्पष्ट करतों व उदाहरणादाखल कांहीं शब्दांचा खुलासा करतों. माझी भूमिका खालीलप्रमाणें आहे :

(१) विचार मांडणें व समजणें ह्यांत गोंधळ होऊं नये म्हणून परिभाषा आवश्यक आहे. पण गोंधळ होण्याचा संभव नसेल तेव्हां पारिभाषिक शब्द एकच असावा असा आग्रह धरण्याचें कारण नाहीं. उदाहरणार्थ, Index No. ह्या अर्थी निर्देशांक, सूचकांक, दर्शकांक ह्यापैकीं कोणताहि शब्द वापरला तरी चालावें.

(२) दोन अगर अधिक शब्दांतून निवड करतांना ज्या शब्दामुळें दुसरे कांहीं शब्द बनवणें सोपें होईल असा शब्द निवडावा. पैसा व चलन ह्यांपैकीं चलन शब्द ह्याच कारणांकरितां मी निवडला आहे. चलन ह्या शब्दामुळें चांगले सामासिक शब्द बनवणें सोयीचें होतें. किंमत ह्या शब्दापेक्षां 'भाव' हा शब्द किंवा बाजारापेक्षां 'पेठ' हा शब्द मी ह्याच कारणाकरितां पसंत करतों. माझ्या ग्रंथाला पैसाशास्त्र व पैसानीति हें नांव कसें दिसलें असतें याचा विचार करावा.

(३) ज्या इंग्रजी शब्दाला मराठी प्रत्यय लावतां येतात, त्याच्यापासून केलेले सामासिक शब्द वाईट दिसत नाहींत ते शब्द बदलण्याचें कारण नाहीं. उदाहरणार्थ बँक, चेक ह्या शब्दांना मराठी शब्द शोधण्याचें कारण नाहीं.

(४) इंग्रजी शब्दाचें भाषांतर शब्दशः करण्यापेक्षां त्यामागील कल्पना स्पष्ट करण्यास अधिक महत्त्व द्यावें. उदाहरणार्थ, Balance of Payments ह्या शब्दांत Balance ह्याचा अर्थ 'बाकी' असा असेल, किंवा नसेलहि. पण देण्याघेण्याची तुलना करून परराष्ट्रीय अर्थव्यवहार आपल्याला अनुकूल आहेत कीं प्रतिकूल आहेत हें ठरविण्यासाठीं ह्या कल्पनेचा उपयोग केला जात असल्यानें देण्याघेण्याचा तोल म्हणणें अधिक योग्य आहे. Balance म्हणजे जर बाकी तर unfavourable balance म्हणजे प्रतिकूल बाकी की काय ? ज्याचा ह्या विषयाचा अभ्यास परिक्षा पास होण्यापुरताच आहे त्याला कदाचित् हे बारकावे समजावयाचे नाहींत पण त्याला इलाज नाहीं.

(५) इंग्रजी शब्द संबंधित कल्पना बरोबर व्यक्त करीत असेल तर शब्दशः भाषांतर करण्यास हरकत नाहीं. उदाहरणार्थ Open Market Operations ने जी कल्पना व्यक्त होते तीच कल्पना खुल्या बाजारांतील व्यवहार ह्या शब्दानें व्यक्त होते. प्रत्यक्षांत खुल्या बाजारांतील व्यवहार रोख्यापुरतेच मर्यादित असले तरी तत्त्वतः तसे ते असण्याचें कारण नाहीं हें पंडिताना सांगितलें पाहिजे असें दिसतें. Operation म्हणजे शस्त्रक्रिया तेव्हां व्यवहार ह्या शब्दापेक्षां शस्त्रक्रिया शब्द बरा वाटतो असें पंडित म्हणाले नाहींत हें नशीब ! खुल्या बाजारांत मध्यवर्ती बँकेने खरेदीविक्री केल्यास, मग ती कसलीहि असो, विशिष्ट परिणाम होतात असें मुख्यतः सांगावयाचें असल्यानें त्या व्यवहारांचें वर्णन रोख्यांची खरेदीविक्री असें करणाराला त्यांचा तपशील समजला पण मर्म समजलें नाहीं असेंच मी म्हणेन.

(६) अपरिचित व परिचित शब्दांपैकीं निवड करतांना परिचित किंवा अधिक परिचितच शब्द निवडावा. कटमिती हा व्याज घेण्याचाच एक प्रकार असल्यानें कटमितीचा दर म्हणण्याऐवजीं व्याजाचा दर म्हणणें चूक नाहीं. हुंड्या वटविण्याला मध्यवर्ती बँकेच्या व्यवहारांत फार महत्त्व होतें ते दिवस आतां इतिहासजमा झाले आहेत. तेव्हां पढिक प्रतिशब्द नको.

(७) प्रत्येक इंग्रजी शब्द बरोबरच असतो अशी कल्पना करून घेऊं नये. Trade Cycle हा इंग्रजी शब्द तितकासा बरोबर नाहीं. कारण तेजीमंदी फक्त व्यापारालाच बाधत नसून सर्व अर्थव्यवहाराना बाधते. तेव्हां 'अर्थोद्योगचक्र' असें म्हणणें अधिक श्रेयस्कर. पण व्यापारचक्र हा संकोच जर चालत असेल तर तेजीमंदीचक्र हा संकोचहि चालावा. कारण त्या चक्रांतील दोन महत्त्वाच्या अवस्था त्यांत दर्शविल्या जातात. इतर अवस्था तपशीलवार विवेचनांत सांगतां येतात. एखादा लेखक आपल्या महत्त्वाच्या गोष्टीचें नांव कथासंग्रहाला नाहीं कां देत ? त्यापैकींच हा प्रकार आहे. व्यापारचक्र ह्या शब्दामुळें एकाहि अवस्थेचा








बोध होत नाहीं. सुरेख पंडित यांना तो होतो ह्याचें कारण त्या विषयाचा त्यांनीं अभ्यास केला आहे. नाहींतर व्यापारचक्र ह्या शब्दावरून कांहींहि कल्पना येत नाहीं. उलट चुकीची कल्पना मात्र होते.

( ८ ) इंग्रजी शब्दापेक्षां अर्थपूर्ण शब्द मराठींत वापरतां येणार नाहीं हा न्यूनगंड सोडून द्यावा. हिक्स यांच्या Indifference ह्या शब्दापेक्षां प्रा. कुलकर्णी ह्यांचा ' समवृत्ति ' हा शब्द कितीतरी अर्थपूर्ण आहे. एकंदर उपभोग्यता सारखी असल्यास निर्माण होणारा संभ्रम Indifference ह्या अकरणात्मक शब्दापेक्षां समवृत्ति हा शब्दच योग्यप्रकारें व्यक्त करतो. दुसरा चांगला शब्द न सांपडल्यामुळें हिक्स ह्यांनी Indifference हा शब्द वापरला हें उघड आहे.

येथें असा इषारा द्यावासा वाटतो कीं परिभाषा हें साध्य नसून साधन आहे. तेव्हां परिभाषेचें भलतें स्तोम माजवण्यांत अर्थ नाहीं. परिभाषेच्या गोंधळामुळें मराठींत अर्थशास्त्राचें अनर्थशास्त्र होत आहे हें वर्णन अतिशयोक्तीचें आहे. परिभाषेचें स्थान काय, तिची घडण कशी होते, इंग्रजीत परिभाषा कशी निश्चित झाली, कित्येक साध्या पारिभाषिक शब्दाबाबत तेथें अजूनहि एकवाक्यता कशी नाहीं ( उदाहरणार्थ, Saving, Investment ) ह्याबाबत अज्ञ पंडितांचा कदाचित् गोंधळ उडत असेल पण अशा गोंधळांतूनच परिभाषा निश्चित होत असल्यानें ती निश्चित करण्याची घाई पंडितानीं करूं नये हें बरें ! अनेक शब्दामुळें परीक्षार्थी विद्यार्थ्यांचें नुकसान होऊं नये म्हणून परीक्षकांनीं मात्र असा संकेत पाळला पाहिजे कीं जेथें अर्थ स्पष्ट आहे तेथें केवळ शब्द वेगळा आहे म्हणून गुण कमी करूं नयेत. विदर्भांतील एका विद्यार्थ्यानें माझ्याकडे अशी भीति नुकतीच पत्रद्वारें व्यक्त केली म्हणून हें लिहिलें आहे.

वरील विवेचनाचा अर्थ परिभाषेबाबत कांहींच करावयाचें आतां राहिलें नाहीं असा नाहीं. परिभाषा निश्चित न झाल्यामुळें विद्यार्थ्यांचें नुकसान होऊं नये अशी दक्षता घेतलीच पाहिजे. तसेंच परिभाषेच्या बाबतींत पाळावयाच्या तत्त्वांची व पथ्यांची चर्चा झाली पाहिजे आणि त्या अनुरोधानें प्रत्येक शब्दाची कसून छाननी झाली पाहिजे. परिभाषा निश्चित करण्याचा पंडितप्रणीत मार्ग फारच सुलभ आहे. स्वस्त शब्दापेक्षां सुलभ शब्द बरा वाटतो म्हटलें कीं झाला गोंधळ; हा कां बरा वाटतो हें सांगण्याची जबाबदारी त्यांच्यावर नाहीं. खरें म्हटलें तर व्याजाच्या म्हणजे पैशासाठीं द्यावा लागणाऱ्या किंमतीच्या संदर्भात स्वस्त हा किंमत सूचित करणारा शब्दच बरोबर ठरतो. सुलभ म्हणजे सहजप्राप्य. व्याज कमी केलें असतें तेव्हां पैसा सहजप्राप्य असतोच असें नाहीं. अशा सुलभ मार्गानें परिभाषा निश्चित होणार नाहीं. अर्थशास्त्राच्या जाणकारांना आवाहन करूनहि काम भागणार नाहीं. कारण ते जाणकार कोण असा प्रश्न उद्भवेल. पंडिताच्या लिखाणाचा सूर असा आहे कीं ज्यांनी मराठीतून अजिबात लेखन केलें नाहीं तेच खरे जाणकार. कारण ज्यांनी लिहिलें आहे त्यांनी कांहीं ना कांहीं गोंधळ केलाच आहे. प्रा. मुरंजनहि त्यांत आहेत. प्रा. धनंजयराव गाडगीळ नसले तरी येतील. कारण ते मराठींत लिहितात आणि रोख चलन व पतचलन हे शब्दहि वापरतात. ( साधनेंतील त्यांचा तिसऱ्या योजनेवरील लेख पहावा. ) ही सर्व मंडळी वगळून उरतात ते जाणकार !

शेवटी मराठी माध्यमाविषयीं थोडें लिहून पंडितांच्या टिपणावरचें हें टिपण संपवतो. प्रथम परिभाषा निश्चित करा, नंतर मराठींत भरपूर पुस्तकें लिहा आणि मग माध्यमाचें पाहूं असें म्हणणाऱ्या लोकांना मराठी माध्यम नको तरी असतें किंवा परिभाषा, ग्रंथलेखन, माध्यम हे टप्पे नसून परस्परांवर अवलंबून असणाऱ्या गोष्टी हें समजत तरी नाहीं. माध्यमावर निर्णय घेतांना शैक्षणिकदृष्ट्या माध्यम कोणतें असावें ह्याच प्रश्नाचा विचार झाला पाहिजे. परिभाषा, ग्रंथांची उपलब्धता हे प्रश्न गौण नसले तरी ते सुटेपर्यंत अडून बसण्याचें कारण नसतें. मराठी माध्यम मला मान्य असलें तरी इंग्रजीचा दर्जा कमी झाला म्हणून तें येऊं नये, तर तें येत असतां इंग्रजीचा दर्जा कायम राहावा, नव्हे वाढावा यावर माझा कटाक्ष आहे. इंग्रजी काढण्याची घाई झाली ह्या पस्तावांत मीहि सहभागी आहे. पण मराठी माध्यमाच्या बाबतींत घाई होत नसून दिरंगाई होत आहे.

---








म. म. डॉ. वा. वि. मिराशी

# जैन वाङ्मयांतील रामगिरी

कविकुलगुरु कालिदासाने निर्वासित यक्षाचें निवासस्थान म्हणून आपल्या मेघदूतांत वर्णिलेला रामगिरि हा कोठें होता याविषयीं गेल्या दोन वर्षांत बरीच चर्चा झाली आहे. ती वाचल्यावर अहमदाबादच्या गुजरात कॉलेजांतील प्राध्यापक डॉ. वा. म. कुलकर्णी यांनी जैन वाङ्मयांतील रामगिरिविषयक उल्लेखांकडे माझें लक्ष वेधलें आणि त्या उल्लेखांचा उपयोग मेघदूतांतील रामगिरीचें स्थान निश्चित करण्याकरितां होतो काय हें पाहावें आणि आपला निर्णय लेखरूपाने प्रसिद्ध करावा अशी पत्रद्वारें विनंती केली. डॉ. कुलकर्णी यांनी माझ्या निदर्शनास आणलेल्या उल्लेखांचें परीक्षण करून मी माझें मत त्यांस कांहीं महिन्यापूर्वी कळविलें होतें, पण लेख लिहिण्यास सवड झाली नव्हती. प्रस्तुत लेखांत त्यांची चर्चा करीत आहे.

जैन वाङ्मयांत रामगिरीचा पहिला उल्लेख[१] विमलसूरीच्या 'पउमचरियां'त ('पद्मचरितां'त) आला आहे. विमलसूरीचा काल निश्चित नाहीं. पउमचरियांतील (प. ११८, १०३) निर्देश खरा मानल्यास तें काव्य महावीर तीर्थंकरांच्या निर्वाणानंतर ५३० वर्षी पूर्ण झालें असावें. डॉ. याकोबी यांनी महावीरांच्या निर्वाणाचा काल खिस्तपूर्व ४७७ हा ठरविला आहे. तेव्हां पउमचरिय खिस्तोत्तर ५३ या वर्षी पूर्ण झालें असें मानलें पाहिजे. पण हा काल सर्वास मान्य नाहीं. पउमचरियाच्या शेवटीं आपण नाइलकुलवंशांतील राहु याचा शिष्य विजय याचा शिष्य आहों अशी माहिती विमलसूरि देतो. नाइल (नागिल) वंश हा नगेन्द्रगच्छच असून तो खिस्तोत्तर ९३ या वर्षी स्थापन झाला असें कल्पसूत्रांतील उल्लेखावरून दिसतें. अर्थातच पउमचरिय खिस्तोत्तर ५३ व्या वर्षी लिहिलें जाणें संभवनीय नाहीं. डॉ. याकोबींच्या मतें तें काव्य खिस्तोत्तर तिसऱ्या शतकांतील असावें. इतर कांही विद्वान् हा काळ एक शतक मागें नेतात. तथापि हें काव्य सध्या ज्ञात असलेल्या प्राकृत काव्यांत सर्वांत प्राचीन आहे असें दिसतें.

विमलसूरीनें रामचरित हा आपल्या काव्याचा विषय केला आहे. पद्म हें रामाचेंच दुसरें नांव होय. बौद्ध ग्रंथकारांनी ज्याप्रमाणें वाल्मीकिरामायणांतील रामकथा घेऊन तिजमध्यें आपल्याला इष्ट ते फेरफार केले त्याप्रमाणेंच विमलसूरीनेंहि त्या रामायणांतील कथा घेऊन तींतील असंभाव्य वाटणारा भाग गाळून किंवा त्याला निराळें रूप देऊन आपलें काव्य रचलें आहे. राक्षसांना वानरांनी मारणें, कुंभकर्णाने सहा सहा महिने निद्रा घेणें आणि जागें झाल्यावर हत्तीसारखे विशाल प्राणी गिळंकृत करणें, रावणाला दहा तोंडें असणें इत्यादि वाल्मीकिरामायणांतील वर्णन असंभाव्य म्हणून असत्य आहे असें विमलसूरीचें म्हणणें आहे. यांपैकी कांहींची उपपत्ति त्यानें निराळ्या रीतीने लावली आहे. उदाहरणार्थ, वानर हे पुच्छधारी प्राणी नसून वानरांचें लांछन धारण करणारे विद्याधर होते. तसेंच रावणाने नऊ रत्नांचा हार गळ्यांत घातल्यामुळें त्यांत पडलेल्या त्याच्या मुखाच्या प्रतिबिंबामुळें तो दशमुखी आहे असें वाटत असे अशी उपपत्ति विमलसूरीने लावली आहे.

विमलसूरीने वाल्मीकिरामायणांतील कथेंत बरेच फेरफार केले असले तरी रामाची कथा बहुतांशीं तशीच आहे. दशरथ वृद्ध झाल्यामुळें पद्माला (रामाला) राज्याभिषेक करूं इच्छितो, पण कैकेयी आपल्याला दिलेल्या वराची त्यास आठवण देऊन तें राज्य आपल्या भरत नामक पुत्राकरितां मागते. तेहां पद्म (राम), लक्ष्मण व सीता यांसह, वनाला जाण्यास निघतो.

---

१. डॉ. याकोबीनी संपादिलेल्या आणि भावनगर येथें प्रसिद्ध झालेल्या 'पउमचरिता'च्या आवृत्तीचा उपयोग प्रस्तुत लेखांत केला आहे. खिस्तोत्तर सातव्या शतकांत रविषेणाचार्याने संस्कृतांत 'पद्मचरित' काव्य रचलें तें 'पउमचरिता'चें विस्तृत रूपांतर आहे.

भरताला हें रुचत नाहीं. तथापि कैकेयी व राम यांच्या सांगण्यावरून तो पद्म परत येईपर्यंत राज्यकारभार पाहण्यास तयार होतो.

रामवनवासांतील कांहीं घटना विमलसूरीने वाल्मीकिरामायणांतल्या प्रमाणें वर्णिल्या आहेत; पण कांहीं भिन्न आहेत. वनवासांत हिंडत हिंडत राम, लक्ष्मण व सीता वंशस्थलपुरास आले. त्या नगराच्या राजाने आग्रह केला तरी रामाने त्यांत प्रवेश न करतां त्याजवळच्या वंशगिरीवर वास केला. त्या पर्वताचें वर्णन करतांना विमलसूरि म्हणतो—

नाणाविहतरुछन्ने नाणाविहपक्खिकलखुग्गीए ।
वरकुसुमगन्धपवणे निज्झरपवहन्तविमलजले ॥ ४,४

( त्या पर्वतावर नानाविध तरूंची दाट छाया होती, अनेक प्रकारचे पक्षी मधुर कूजन करीत होते, उत्कृष्ट पुष्पांचा सुगन्ध दरवळत होता आणि विमल जलाचे निर्झर वाहत होते. )

त्या ठिकाणीं त्या नृपतिश्रेष्ठाने रामादिकांकरितां सर्व प्रकारचे सुखोपभोग पुरविले आणि त्या पर्वतावर रामाच्या आज्ञेने अनेक जिनश्रेष्ठांचीं मंदिरें बांधलीं.

( तत्थेव वंससेले पउमाणत्तेण नखरिन्देणं ।
जिणवरभवणाइ तऊ निवेसियाइं पभूयाइं ॥ )

नंतर कांही काल तेथे घालविल्यावर रामाने लक्ष्मणास म्हटलें—

अह अन्नया कयाई भणिऊ रामेण तत्थ सोमित्ती ।
मोत्तूण इमं ठाणं अन्नं देसं पगच्छामो ॥
निसुणिज्जइ कण्णरवा महाणई तीए परएणं ।
मणुयांण दुग्गमं चिय तरुबहलं दण्डयारण्णं ॥

राम लक्ष्मणाला म्हणाला, 'आतां आपण हें ठिकाण सोडून दुसरीकडे जाऊंया. कर्णरवा नांवाच्या नदीपलीकडे मनुष्यांना दुर्गम असें दाट झाडीचें दण्डकारण्य आहे. त्यांत आपण झोपडी बांधून राहूं.' त्याप्रमाणें राम, लक्ष्मण व सीता तेथून निघून दण्डकारण्याकडे निघाली. नंतर विमलसूरि म्हणतो—

रामेण जम्हा भवणोत्तमाणि
जिणिन्दचन्दाण निवेसियाणि ।
तत्थेव तुङ्गे विमलप्पभाणि
तम्हाजणे रामगिरी पसिद्धो ॥

त्या तुंग पर्वतावर रामाने जिनेन्द्रांकरितां उत्कृष्ट आणि देदीप्यमान अशीं मन्दिरें बांधिलीं म्हणून तेव्हांपासून तो पर्वत रामगिरी या नांवानें प्रसिद्ध झाला.

पउमचरियांतील हें रामगिरीचें वर्णन कितपत यथातथ्य होतें हें सांगतां येत नाहीं. त्यांत बराचसा भाग काल्पनिक असावा. तथापि त्यावरून विमलसूरीच्या काळीं ( खिस्तोत्तर दुसऱ्या–तिसऱ्या शतकांत ) दण्डकारण्याच्या उत्तरेस रामगिरि नांवाचा पर्वत प्रसिद्ध होता असें मात्र स्पष्ट दिसतें. त्या ठिकाणीं रामाचा निवास कांहीं काळ झाल्यामुळें त्या पर्वताला हें नांव प्राप्त झालें होतें असें विमलसूरि सांगतो. रामगिरि पर्वताचें हें भौगोलिक स्थान रामटेकाला जुळणारें आहे. रामटेकवर शम्बूकाच्या तपश्चर्येचें स्थान दाखविण्यांत येतें. शम्बूक जेथें तपश्चर्या करीत होता. तेथून भयंकर श्वापदांनी ज्यांतील गिरिगव्हरें व्यापिलीं आहेत असें दण्डकारण्य दक्षिण दिशेस पसरलें होतें असें भवभूतिहि उत्तररामचरितांत सांगतो[2]. तेव्हा रामटेक हेंच विमलसूरीस विवक्षित असावें. निदान खिस्तोत्तर ४०० पासून रामटेक रामगिरि नांवाने प्रसिद्ध होतें हें वाकाटकांच्या कोरीव लेखांवरून सिद्ध झालें आहे[3]. पुण्य क्षेत्र म्हणून त्याची प्रसिद्धि त्यापूर्वी एक दोन शतकें असल्यास नवल नाहीं.

रामगिरीवर जैनांचीं मंदिरें होतीं हें वर्णन मात्र काल्पनिक दिसतें. कारण तशा मंदिरांचे अवशेष रामटेकच्या टेकडीवर आढळत नाहींत. पण त्या टेकडीवर नसलीं तरी त्याच्या आसपास जैनमंदिरें असावीं. त्यांपैकीं एका मंदिरांतील शांतिनाथ या जैन तीर्थंकराची सुंदर व भव्य पंधरा फूट उंचीची मूर्ति कांही वर्षांपूर्वी रामटेकच्या परिसरांत सांपडली होती, ती फार प्राचीन

२ 'एतानि खलु सर्वभूतरोमहर्षणान्युन्मत्तचण्डश्वापदकुलसङ्कुलगिरिगह्वराणि जनस्थानपर्यन्तदीर्घारण्यानि दक्षिणां दिशमभिवर्तन्ते ।' उत्तररामचरित, २।१५.

३ 'रामगिरिस्वामिनः पादमूलात्' हा वाकाटक राज्ञी प्रभावती गुप्ता हिच्या ऋद्धपूर ताम्रपटांतील उल्लेख पाहा. 'मेघदूतांतील रामगिरि अर्थात् रामटेक,' पृ. १०८.










अनुक्रमणिका

आहे असें म्हणतात. धार्मिक जैन समाजाच्या उदार दातृत्वाने ती मूर्ति रामटेक येथें एका प्रशस्त जैन-मंदिरांत बसविली आहे. त्याच आवारांत पार्श्वनाथ व चंद्रप्रभु यांचीं मंदिरें आहेत. रामटेकजवळ नागार्जुनाची म्हणून एक टेकडी दाखविण्यांत येते. शिवाय रामटेक-जवळ एका तळयाच्या कांठीं कांहीं पुरातन अवशेष दिसतात ते बौद्धविहाराचे असावे असें कै. रा. ब. काशीनाथपंत दीक्षित यांचें मत झालें होतें. तेव्हां रामटेक हें स्थान हिंदू, जैन व बौद्ध या तीनहि धर्मांच्या दृष्टीनें पवित्र होतें.

पउमचरियांतील रामगिरीचें वर्णन रामगडच्या मात्र सर्वस्वी विरुद्ध जातें. कारण त्या पर्वतावर किंवा त्याच्या समंतात् जैन धर्माच्या मंदिराचे अव-शेष सांपडले नाहींत, आणि त्याच्या दक्षिणेस दण्ड-कारण्य होतें असेंहि प्राचीन संस्कृत वाङ्मयांतील त्या अरण्याच्या वर्णनावरून दिसत नाहीं.

---










श्री. रा. वि. अधिकारी

# माणगांव तालुक्यांतील गांवांची नांवें

नवभारत मासिकाच्या जून ते सप्टेंबर पर्यंतच्या चारी अंकांत माझा वरील शीर्षकाचा लेख प्रसिद्ध झाला आहे. लेख प्रसिद्ध झाला पण तो विषय कांहीं डोक्यांतून दूर झाला नाहीं. अधिकाधिक निरीक्षण आणि चिंतन यामुळें विषयावर अधिक प्रकाश पडला आहे. हा मागून सुचलेला व मनाला रुचलेला भाग पुनः आपणांसमोर सादर करीत आहे.

जों जों अधिकाधिक प्रकाश पडून नवीन नवीन कल्पना सुचतील तसतसें लेखाचें मूळस्वरूप आणि त्यांत केलेलें वर्गीकरण हें बदललें जाणें स्वाभाविकच आहे. पण सत्यसंशोधनाची तळमळ आणि विषयाचा अधिक अभ्यास करण्याची हौस असल्यामुळें पूर्वींचे तर्क चुकीचें ठरल्यामुळें मनाला खेद होत नसून एक प्रकारचा आनंदच होत आहे. आणि आणखी कोणी यावर नवीन प्रकाश पाडून अधिक मार्गदर्शन करून माझ्या चुकांचें माप माझ्या पदरांत घालील तर मला आनंदच होणार आहे.

वृक्षबोधक नांवांत खर्डी-खुर्द आणि खर्डी-बुद्रुक या दोन गांवांचा मी समावेश केला आहे. कारण खर्डी म्हणजे उंडिणीचें झाड हा महाराष्ट्र शब्दकोशांतील अर्थ मी गृहीत धरला होता. पण आतां अधिक विचारांतीं मला तें योग्य वाटत नाहीं. कारण पुनः अधिक तपास करतां खर्डी या गांवीं उंडिणीचीं झाडें सध्यांतर नाहींतच पण पूर्वींहि असल्याचें कोणी सांगत नाहीं. मग हें गांवाचें नांव कसें पडलें हा प्रश्न पडला. पण मग सहज नालंदा शब्दसागर हा हिंदी शब्दकोश चाळतांना खर या शब्दाचा तृण हा अर्थ नजरेस पडला आणि या गांवांच्या नांवाचा उलगडा झाला. या गांवीं शेतीपेक्षां चराऊ जमिनी अधिक असल्यामुळें तेथें गवळ्यांची वस्ती आहे व त्यांनीं खर म्हणजे तृण—गवत या शब्दाला डी हे ग्रामत्ववाचक पद लावून हें गांवाचें नांव बनविलें आहे हें लक्षांत आलें. म्हणजे वृक्षबोधक नांवांतून हीं दोन नांवें कमी होऊन तीं निसर्गबोधक वर्गांत सामील होतात असें म्हटलें पाहिजे.

आणि या गांवांच्या नांवावर प्रकाश पडतांच खरवली या गांवाच्या नांवाच्या अर्थांतहि बदल घडून आला आहे. खरवली हें गांवाचें नांव निसर्गबोधक वर्गामध्यें दिलें आहे. त्याचा तो वर्ग कांहीं बदलत नाहीं; पण अर्थ मात्र पालटत आहे. खर म्हणजे गाळ असा या गांवांच्या नांवांतील पूर्वपदाचा अर्थ धरून मी त्याबद्दल विवेचन केलें आहे. पण या गांवाच्या नांवांतील खर म्हणजेहि तृण अथवा गवत होय असें अधिक तपासांतीं कळून आलें. कारण खरवलीस नदीच्या अथवा तळयाच्या गाळाच्या साह्यानें तयार केलेल्या जमिनी नाहींत पण तेथें पूर्वीं गवळी लोकांची वस्ती मात्र मोठी होती आणि एकदा पटकीची मोठी साथ येऊन तेथील ही गवळयांची वस्ती उठून गेली आणि नजीकच्याच काकडशेत गांवाच्या हद्दींत गवळवाडी या नांवाची एक नवीनच वाडी त्यांनीं वसविली आहे अशी माहिती मिळाली. अशा रीतीनें खरवली, खर्डी हीं गांवांचीं नांवें गवताळ अशा चराऊ जमिनींचें आधिक्य दाखवणारीं चरईच्या वर्गांतील ठरलीं आहेत.

साजें हें गांवाचें नांव मी विशेषणयुक्त गांवांच्या नांवाच्या वर्गांत घातलें आहे. परंतु त्यावेळींच यांतील जें हें अक्षर ग्रामत्वबोधक असल्याचा संभवहि प्रकट केला होता. (पहा:लेखांक ४ था) तोच संभव खरा ठरला आहे. 'सा' या एकाक्षरी शब्दाचा अर्थ उमा अथवा लक्ष्मी आहे असें गीर्वाण लघुकोशावरून दिसतें. म्हणजे साजें हें गांव देवतावाचक गांवांच्या नांवांच्या वर्गांतील असल्याचें दिसून येतें. आणि सा म्हणजे देवी या अर्थानें गांवांच्या नांवांत वापरल्याचें इतर गांवाच्या नांवांवरून दिसून येतें. महाडतालुक्यांतील सापें हें गांव या प्रकाराचें उदाहरण आहे. सापें येथील गांवदेवी काळकाई आहे. म्हणजे उमेचेंच रूप! तिच्या नांवावरून तें गांवाचें नांव पडलें आहे.



अनुक्रमणिका

तसेंच साजें हेंहि गांवाचें नांव देवीवाचक आहे निश्चित असें वाटतें.

या साज्याच्या नांवाच्या प्रकाशांत सालें या धान्य-बोधक वर्गांत घातलेल्या गांवाच्या नांवांत कांहीं अर्थाच्या दृष्टीनें फेरबदल होतो कीं काय म्हणून अधिक तपास करूं लागलों. पण तसा फेरबदल होत नाहीं असें आढळून आलें. कारण साल्याचा ग्रामदेव बहिरी (कालभैरव) आहे, देवी नाहीं असें कळून आलें म्हणून त्या नांवांत दैवतवाचकत्व नसून धान्यवाचकत्वच कायम राहिलें आहे.

लोणेरें हें गांवाचें नांव लोण या शब्दाला एरें हें ग्रामवाचक पद लागून झाला आहे असें मी लिहिलें आहे. (पहिला लेखांक) पण आतां विचाराअंती त्यांत थोडी चूक दिसून येत आहे. लोण+एरें असा हा शब्द झालेला नसून तो लोण+नेर असा संधि होतांना नकाराचा लोप होऊन तो तयार झाला आहे असें दिसतें. कारण ऊर म्हणजे गांव या ग्रामत्व बोधक पदाचें रूप ओरें होणें साहजिक आहे पण तें एरें असें होईल असें वाटत नाहीं. या दृष्टीनें विचार करतां या शब्दांत ग्रामत्वदर्शक पद एरें नसून नेरें आहे असें ठरतें. आणि नेरें हें पनवेल तालुक्यांतील एका गांवाचें नांवहि आहे व या तालुक्यांतील पोटनेर या गांवाच्या नांवांत तें पद आलेलेंहि आहे. या बदलामुळें गांवाच्या नांवाच्या अर्थांत बदल होत नाहीं अर्थात वर्गहि बदलत नाहींच हें उघड आहे.

वारक हें गांवाचें नांव वारीक म्हणजे न्हावी हा अर्थ ग्रहीत धरून जातिवाचक नांवांत घातलेलें आहे. पण तें चुकीचें असावें असें वाटतें. कारण त्या गांवाशी न्हावी लोकांचा पूर्वीसुद्धां कांहीं संबंध होता असें तपासाअंतीं समजून येत नाहीं. तसेंच वारीक या आडनांवाच्या कुणबी लोकांचाहि त्या गांवाशीं कांहीं संबंध आल्याचें दिसत नाहीं. म्हणून मनाला असमाधान वाटत होतें. पण नालंदा शब्दसागरांत वारक या शब्दाचा अर्थ घोडा असा दिलेला आढळून आला. आणि मग एका संस्कृतज्ञ शास्त्रीबुवापाशीं या शब्दाबद्दल चर्चा केली. तेव्हां त्यांनीहि 'वारू म्हणजे घोडा या शब्दाला 'क' हा स्वार्थी प्रत्यय लागून वारक म्हणजे घोडा हा शब्द होईल असें मत दिलें. "जसें बाल आणि बालक यांच्या अर्थांत फरक होत नाहीं तसाच वारू आणि वारक यांच्या अर्थांतहि कांहीं फरक नाहीं" असें त्यांनीं सांगितल्यावरून हें अनुमान निश्चित करून हें गांवाचें नांव प्राणिवाचक वर्गांतील आहे हें निश्चित केलें. या तालुक्यांतील घोड्यावरून पडलेलें हें गांवाचें नांव आहे. एक घोडेगांव

मांद म्हणजे रुंद तोंडाचें मातीचें भांडें या शब्दाला आड हें ग्रामत्वबोधक पद लागून मांदाड नांव पडलें असल्याचें मी प्रथम लिहिलें आहे. (लेखांक ३ रा) पण तें योग्य नसावें असें आतां वाटतें. मांद या शब्दाचा गुंफा, हिंस्रपशूचें निवासस्थान असा हिंदी भाषेंत अर्थ आहे हें ठाऊक होतें, पण या तालुक्यांतील गांवांच्या नांवांवर हिंदी भाषेचा परिणाम झाला असेल असें वाटत नव्हतें. यामुळें व गुंफा म्हणजे लेणी मांदाड या गांवाच्या प्रत्यक्ष हद्दींत नसून कुडे या शेजारच्या गांवाच्या हद्दींत आहेत त्यामुळें तसा तर्क मांडावयास धीर होत नव्हता. पण त्या भागांतील कांहीं स्नेह्यांजवळ चौकशी करतां मांदाड आणि कुडें मिळून पूर्वी एकच गांव असावा असा तर्क निघाला आणि मग एवढ्या पुष्कळ आणि विस्तीर्ण गुंफा म्हणजे लेणी असलेल्या गांवाला मांदाड हें नांव पडावें हें साहजिकच वाटलें. या मांदाड गांवाच्याच कुड्याच्या झाडाच्या सांनिध्यांत वसलेल्या वाडीला स्वतंत्र गांवाचा दर्जा प्राप्त होऊन कुडे हा गांव झाला असावा आणि लेण्यांचा समावेश त्या कुडयाच्या सीमेंत झाला तरी मूळ मांदाड हें बंदर गांवाचें नांव कायम राहिलें असावें. एकंदरींत मांदाड हें तेथील (शेजारील) लेण्यांची खूण सांगणारें गांवाचें नांव आहे हें निश्चित.

गांवांच्या नांवावर माणगांव तालुक्यांतसुद्धा हिंदी भाषेचा परिणाम झाल्याचें जसें मांदाड या गांवावरून दिसून येतें तसेंच आणखीहि एक उदाहरण आढळून आलें. जावठे या गांवाची अर्थ संगति लागत नाहीं असें मी पूर्वी म्हटलें आहे (लेखांक ३ रा पहा). पण आतां हिंदीच्या प्रकाशांत त्या नांवाचा अर्थ लक्षांत आला. नालंदा शब्दसागरांत 'याव' या शब्दाचा अर्थ लाख असा दिला असून यावचेंच रूप जाव असें होणें साहजिक आहे. व या जाव शब्दालाच ठे हें








ग्रामत्वदर्शक पद लागून जावठे हें गांवाचें नांव तयार झालें आहे. म्हणजे या गांवीं पूर्वी रानांतून झाडांवरील लाख गोळा करण्यांत येत असावी असें या नांवावरून कळून येतें. अजूनहि करूं दिल्यास या भागांत लाख गोळा करण्याचा धंदा करतां येईल. मी २०।२२ वर्षांपूर्वीं त्या भागांत गेलों होतों तेव्हां तेथील भागांतून बरीच लाख मिळवून विकल्याचें ( लाखेचे भाव वाढले होते अशाकाळीं ) एक व्यापारी सांगत होते.

जावठे याचा अशातऱ्हेनें अर्थ निश्चित झाल्यावर जावली हें एक समाधानकारक अर्थ न लागलेलें गांव नजरेसमोर आलें. आणि हिंदीच्या प्रकाशांत त्याचाहि खुलासा झाला. 'जा' या एकाक्षरी शब्दाचा अर्थ इंद्रपत्नी शची- देवरानी असा हिंदीच्या काशी विद्यापीठाच्या शब्दकोशांत व नालंदाशब्दसागरांतहि सांपडला. या जा शब्दालाच वली हें ग्रामत्वबोधक पद लागून जावली हें गांवाचें नांव निश्चित झालें. कारण जावली येथील ग्रामदैवतहि बहिरी वगैरे देव नसून सोमजाई ही देवीच आहे. जसें इंद्रावरून झालेले इंदापूर नांवाचें गांव या तालुक्यांत आहे. तसेंच त्याच्या पत्नीच्या नांवावरून पडलेलें हें जावली गांवहि आहे असें दिसून आलें. म्हणजे दैवतवाचक नांवांत सार्जे आणि जावली या दोन नांवांची भर पडली आहे.

शिलीम या गांवाचें नांव चिलीम या शब्दावरून पडलें असावें असें अनुमान मी जवळजवळ निश्चित स्वरुपांत प्रथम लिहिलें आहे. पण माझें तें अनुमान चुकीचें असावें असें आतां वाटूं लागलें आहे. कारण कै. धनुर्धारी यांचें पुस्तक पानपतची मोहीम वाचतांना त्यांत पानपतच्या युद्धाच्या वेळचा दिल्लीचा बादशहा दुसरा अलमगीर याची पत्नी चंदाजमानी व मलकाजमानी या शिळीमगड येथें होत्या असें वर्णन आहे. म्हणजे शिलीम या शब्दाला दिल्ली प्रांतांत कांहीं वेगळा अर्थ असावा असें त्यावरून वाटूं लागलें. पण २।३ हिंदीशब्दकोशांत मात्र शिलोम हा शब्दच मिळाला नाहीं. यामुळें त्याबद्दल नक्की निर्णय मात्र करितां आला नाहीं पण हें गांवाचें नांव उत्तरभारतीय भाषेच्या प्रभावानें झालें आहे हें खास.

आडनाळे या गांवाच्या नांवाबद्दल लिहितांना 'आड आणि नाल्याची सोय पाहून वसवलेलें गांव तें आडनाळे' असें मी लिहिलें आहे. ( लेखांत १ ला पहा ) पण आतां एक असा सुयोग्य तर्क सुचतो कीं आडणा म्हणजे अडचण. या शब्दाला ळे हें ग्रामत्ववाचक पद लागूनहि हें नांव तयार झालें असण्याचाहि संभव आहे. कारण आडनाळे हें गांव घाटावरून मांदाड बंदराकडे जाणाऱ्या जुन्या रस्त्यावरील गांव आहे. हा गांव एका डोंगरावर असून तेथून पुढें जातांनाहि पुन्हां एक टेकडी चढून जावें लागतें. त्यामुळें आपला माल घेऊन बंदराकडे जाणाऱ्या सार्थवाहाना तें ठिकाण म्हणजे आडणा वाटावें हें साहजिकच आहे. आणि अशा आडण्याच्या ठिकाणीं वसलेलें गांव आडनाळे म्हणून ओळखलें जाऊं लागलें असणेंहि अशक्य नाहीं. निश्चित सांगता येत नाहीं पण दोन्हीं अनुमानें सारखींच जोरदार आहेत. पण दुसरा तर्कच बरोबर असेल तर पदरहित ग्रामनामांतून हें एक नांव कमी होऊन ळे या पदानें झालेल्या गांवांच्या नांवांत एका नांवाची भर पडेल. पण या गांवाचें वर्गीकरण करतांना त्याला निसर्गसूचक गांवांत घातलें आहे तें मात्र कायमच राहील.

बेडगांव – ऑगस्ट महिन्यांतील नवभारताच्या अंकांत ३६ व्या पृष्ठावर बेडगांव या गांवाबद्दल तें बेडें म्हणजे वाटेवर बसविलेलें दुबेळक्याचें लाकूड ( गुरें जाऊं नयेत, फक्त माणसें जावींत म्हणून ) अथवा गुरांचा गोठा यावरून तयार झाल्याचें लिहिलें आहे. पण तसें नसून बेट्ट म्हणजे डोंगर या कानडी शब्दाला गांव हें ग्रामत्वदर्शक पद लागून तें तयार झालें आहे. डोंगरोलीच्याच अर्थाचा हा गांव आहे. आणि त्याच्या भौगोलिक परिस्थितीवरून हाच तर्क साधार वाटतो. बेट्टचें रूप बेड झालें आहे.

गोरेगांव – घोडेगांववरून हा शब्द झालाचें २ ऱ्या लेखांत लिहिलें आहे. कारण कुलाबा गॅझेटिअरमध्यें तसें लिहिलें आहे. पण डॉ. भांडारकरांच्या दक्षिणच्या इतिहासावरून तें बरोबर नसावें असें वाटतें. तेव्हां गुरू म्हणजे मोठें गांव तें गोरेगांव असा तो शब्द बनला असेल असाहि संभव आहे. व तें गांव विशेषणयुक्त गांवांत जाईल.

याप्रमाणें मागून सुचलेले विचार पुन्हां मांडलें आहेत. एक आणखीहि खुलासा करावयास हवा. वृक्ष-











वाचक नांवांत आंबडोशी या गांवाचा आंब्यावरून झालेल्या गांवांच्या नांवांत समावेश केला आहे. पण पुढें त्याबद्दल लिहितांना कदाचित् हा शब्द आंबाडा या झाडावरूनहि झाला असेल असें सूचित केलें आहे. पण आंबडोशी हा शब्द आम्र या संस्कृत शब्दाला ओशी हें ग्रामवाचक पद लागून झाला आहे व त्यांतील रकाराचें डकारांत रूपांतर झालें आहे (आणि असें येथील स्थानिक लोकांच्या बोलण्यांत नेहमींच घडतें) असें दिसून येतें. हें माझ्या लक्षांत आणून दिल्याबद्दल मी डेक्कन कॉलेज (पुणें) चे रजिस्ट्रार श्री. भागवत यांचा फार आभारी आहे.

---





अनुक्रमणिका

प्रा. भालचंद्र शंकर भणगे

# लहान धंदे * : तत्त्व आणि व्यवहार

**भांडवलशाहीच्या** विकासांत एक विरोध लक्षांत घेण्याजोगा आहे. तो असा कीं ह्या विकासकालांत जवळ जवळ प्रत्येक धंदा मोठ्या आकाराचा (size, scale) बनला. the bigger, the better असें व्यवहारांत समजलें जाऊं लागलें; उलट लहान माणूस मोठ्या महत्त्वाचा आहे, तो निष्पाप आहे, त्याचें जतन केलें पाहिजे, त्याचा विकास साधला पाहिजे असें तत्त्वज्ञान वाढलें! मोठ्या परिमाणावरील धंद्यानें लहान माणसावर आक्रमण केलें होतें म्हणून लहान माणसाच्या संरक्षणासाठीं हें तत्त्वज्ञान उभें राहिलें हें केवळ अर्धसत्य आहे. खरें पाहतां लहान माणसाचें माहात्म्य आणि मोठ्या धंद्याची महती ह्या दोन्हींची उत्पत्ति एकदम झाली आहे. लहान माणसाच्या वतीनें जे कार्यक्रम मांडण्यांत येतात त्यांत लहान परिमाणावरील धंद्यांचे गोडवे गाइले जातात आणि मोठ्या धंद्यांच्या जमान्यांत हे गोडवे गातांना साहजिकच त्यांत भावनेचा जोर ओतावा लागतो. आज चित्र दिसतें तें असें कीं लहान आकाराच्या धंद्यांच्या पुरस्कारांत आणि कार्यक्रमांत मृदु भावना विशेष आढळते आणि तर्कनिष्ठ विचार कमी असतो. विचार असतो त्यालाहि सांप्रदायिक स्वरूप येतें, परंतु देशाची पुनर्रचना किंवा प्रगति योजनेच्या मार्गानें साधतांना तर्कनिष्ठ विचार करण्यावाचून गत्यंतर नाहीं.

## कांहीं अवास्तव अपेक्षा

धंदे लहान लहान आकाराचे असावे अशी मागणी कां असावी? उत्तरें अनेक दिलीं जातात. उद्योगधंदे (आणि शेतीहि) मोठी असली तर उद्योगपति वगैरे बडे दादा निर्माण होतात आणि ते लोकशाही सरकारास शह देतात असें एक राजकीय स्वरूपाचें उत्तर मिळतें. अमेरिकेच्या (यू. एस्. ए.) एका अध्यक्ष (रूझवेल्ट) यांनीं जाहीर तक्रार मांडली होती तिची येथें आठवण होते. हें उत्तर खरें असेलच असें नाहीं. कारण लोकशाही दुर्बल असली तरच तिला भांडवलशहांचा विशेष उपसर्ग पोंचतो. खेरीज, विषमता असली तरच भांडवलशहांना विशेष सामर्थ्य प्राप्त होतें. मोठ्या परिमाणावर सर्वच धंदे केले जाऊं लागले, सगळींच माणसें श्रीमंत झालीं तर विषमता राहण्याचें कारण नाहीं.

लहान धंदा लहान माणसाच्याच हातीं राहील असेंहि नाहीं. मोठे धनिक अनेक लहान लहान धंदे उघडतांना दिसतात. मुंबईतील मोठ्या धनिकांनीं महाराष्ट्रांत इतरत्र लहान धंदे काढल्याचीं किंवा घेतल्याचीं बरींच उदाहरणें आहेत. तसेंच धंदा काढतांना जो माणूस लहान असतो तो नफा मिळवून, धंदा वाढवून मोठा झाल्याचेंहि दिसतें. २० ते ३० टक्के नफा मिळणारे लहान धंदे आहेत आणि त्यांतून मोठीं झालेलीं माणसेंहि आहेत. लोकशाहीस हीं माणसें कमी तापदायक नाहींत.

लहान धंद्यांत मजुरांचें जीवन मोठ्या धंद्यांतल्यापेक्षां अधिक सह्य असतें असेंहि नाहीं. (ह्या देशांत सुद्धां) कांहीं मोठ्या धंद्यांनीं मजुरांना दिलेलें वेतन किंवा पुरविलेल्या सुखसोई स्पृहणीय आहेत. उलट कांहीं लहान धंदे मुख्यतः मजुरांच्या (विशेषतः बायकांच्या आणि मुलांच्या) पिळणुकीवर तरारतात! जुन्या संस्थानांत लहान लहान बरेच धंदे निघाले होते त्याचें एक कारण तेथें गिरणी कायदा ढिला होता हें एक उघड गुपित आहे. मोठ्या धंद्यांत नफा फार, पण दरमाणशीं भांडवलहि मोठें. लहान धंद्यांत नफा कमी, पण दरमाणशीं भांडवलहि कमी. नफ्याचें भांडवलाशीं प्रमाण काढलें तर कांहीं यशस्वी लहान धंद्यांत तें बरेंच अधिक आहे असा अनुभव येतो.

* लेखक कोल्हापूर येथें राहणारे असल्यामुळें त्यानीं आपल्या अनुभवावरून दिलेलीं उदाहरणें कोल्हापूर भागांतील आहेत.









अनुक्रमणिका

लहान धंदे अनेक ठिकाणीं विखुरतात त्यामुळें राज्यांतील सर्व भागांत रोजगारी सारखी पसरली जाते हें मर्यादित अर्थानें खरें आहे. लहान धंदा प्रत्येक खेड्यांत निपजेल असा तर समज नाहीं ना ? प्रत्येक खेड्यांत असूं शकतील असे धंदे आजहि आहेत. उदा० शिंपी, न्हावी वगैरे जुन्या बलुतदारींतील धंदे किंवा पिठाची गिरणी वगैरे आधुनिक धंदे ह्या धंद्यांच्या बाबतींत, एखाद-दुसऱ्या केंद्रांतील मोठे धंदे आणि हे धंदे यांची स्पर्धा संभवत नाहीं. वाद आहे ज्या लहान धंद्यांसंबंधीं ते (उदा. कापड विणणें, फर्निचर तयार करणें, छोटीं इंजिनें तयार करणें) सुद्धां कांहीं केंद्रें बनवून राहतात. मोठ्या केंद्रांबरोबर कांहीं लहान केंद्रें निर्माण होतात आणि लहानमोठीं मिळून डझनवारी तीं असूं शकतात इतकेंच.

गांधीवादी किंवा सर्वोदयवादी विचारसरणींत 'लघुत्व' हेंच मूल्य मानलें जातें. 'लहानपण दे गा देवा' असें सांगितलेलें असतें. माणसाच्या राहणींत साधेपणा असावा, गरजा कमी असाव्या, परावलंबन (माणसांचें, खेड्यांचें, देशांचें) कमी व्हावें, सामाजिक जीवनाची गुंतागुंत कमी व्हावी वगैरे अपेक्षा असतात. लहान धंदे ह्या विचारसरणींत आदर्श समजले जातात. गांधीवादी किंवा सर्वोदयप्रणीत समाजरचना अस्तित्वांत येण्यासारखी असली तर लहान धंद्यांचें श्रेष्ठत्व वादातीत आहे. पण सध्यां जो आमूलाग्र वेगळा असा समाज आपण पाहतों आहोंत त्या समाजांत लहान धंद्यांचें स्थान ठरवितांना त्याच समाजाच्या चौकटींत त्याचा विचार केला पाहिजे. असा विचार केला तर वर जीं मतें मांडलीं आणि लहान धंद्यांकडे कोणत्या दृष्टीनें पाहून चालावयाचें नाहीं तें सांगितलें तें सगळें प्रथमदर्शनीं विचित्र वाटलें तरी पटण्याजोगें असावें.

## लघु धंद्याचें खरें स्थान

मग लहान धंद्यांचें खरें स्थान कोणतें समजावें ? (१) लहान माणूस फक्त लहान परिमाणावर धंदा काढूं शकतो. गरीब आणि चार पुस्तकें शिकलेला मजूर आपल्या कर्तबगारीवर जो धंदा काढतो तो लहान असणार. मागसलेल्या जातींतल्या किंवा समाजांतल्या माणसानें धंद्यास सुरवात करावयाची तर तो पहिल्यानें लहान धंद्यात प्रवेश करील. मोठ्या धंद्यास लागणारें भांडवल, कौशल, तज्ज्ञांचें साहाय्य, प्रचंड औद्योगिक उलाढालींचें ज्ञान, सरकारी यंत्रणेची माहिती ह्या सर्वांचा तोकडेपणा लहान माणसांच्या आड येतो. लहान धंद्यांविषयीं आत्मविश्वास वाटतो आणि जवळीक वाटते म्हणूनहि सामान्य माणूस त्यांच्याकडे ओढला जातो. एखाद्या विधवा बाईनें आपल्याकडील पैसा गुंतवावयाचा ठरविलें तर ती लहान धंद्याचा पहिल्यानें विचार करते. कोल्हापूर येथील छोटे धंदे काढलेलीं बहुतेक माणसें अशीं सामान्यांतून वर आलेलीं दिसतात. ह्यापैकीं बरेच कारखानदार कांहीं वर्षांपूर्वी ३०-४० रु. मजुरी मिळविणारे कामगार होते; ह्यांतील कांहींचें शालेय शिक्षण सहीपुरतें मर्यादित होतें; कांहीं धंद्यांत वकिलांनीं, पेन्शन घेतलेल्या कारकुनांनीं आणि गाणाऱ्या बायकांनीं पैसे गुंतविले आहेत.

मोठे धंदे हे भारतांत कांहीं विशिष्ट समाजाची किंवा जातींची मक्तेदारी झाली आहे. त्या समाजाविषयीं किंवा जातींविषयीं दुजाभाव असण्याचें कारण नसलें तरी ह्या केंद्रियीकरणाचा एक प्रकार म्हणून वाईट आहे. समाजाचे सर्व भाग सारख्या तोलाचे किंवा स्थानाचे असणें आवश्यक असतें. नाहींतर समाजाच्या ह्या भागांत किंवा जातींत उच्च कनिष्ठ असा भेद उद्भवतो. छोटे धंदे सर्व जातींच्या लोकांना पेलूं शकतात. कोल्हापुरांत दिसतें कीं येथील सर्वांत मोठा (म्हणजे गुळाचा) व्यापार गुजराती समाजाच्या हातीं असला तरी येथील लहान धंद्यांत छप्पन पगड समाजांतील किंवा जातींचीं माणसें गुण्यागोविंदानें वैभव प्राप्त करून घेत आहेत. येथें गुजराती आहेत तसे महाराष्ट्रीय मोठ्या संख्येनें आहेत. मुसलमान आहेत. लिंगायत आणि जैन आहेत. ब्राह्मण आणि मराठे आहेत. ह्या सगळ्यांची जात ब्राह्मण, मराठे इ. असण्यापेक्षां कारखानदार अशी एकच आहे. मजुरांमध्ये जातवारी आणखी कमी होते हें मोठ्या औद्योगिक केंद्रांतील सत्य येथेंहि दिसतें. औद्योगिकीकरणामुळें ज्ञातिभेदाचे कंगोरे झरतात हें तत्त्व छोट्या धंद्यांमुळें ह्या लहान गांवीं येऊं शकलें.

धंद्यांचें विकेंद्रियीकरण होतें हा लहान धंद्यांचा दुसरा मोठा फायदा. प्रत्येक राज्यांत धंद्यांचीं मोठीं केंद्रें निर्माण झालीं असून तेथील माणसांची गर्दी आणि उलाढालींचा व्याप ह्यामुळें सामाजिक आणि








आर्थिक नुकसान होत आहे. नवे धंदे इतर ठिकाणीं वसले तर त्या गांवांना महत्त्व येईल आणि जुन्या केंद्रावरील भर कमी होईल. विशेषतः ह्या जुन्या केंद्राकडे जी माणसांचीं रीघ लागली आहे आणि बरींच लहान गांवें ओस पडत आहेत त्यांतून जीं अरिष्टें उद्भवतात तीं कमीं होतील. पण विकेंद्रियीकरणाच्या फायद्यासाठीं नव्या केंद्रांत निघणारे धंदे हे लहान परिमाणाचे हवेत असें कोठें आहे? मोठे धंदे निघून त्यांचीं नवीं केंद्रें तयार झालीं तरी चालेल! मोठे धंदे काढणें अवघड असतें, त्यामुळें ते थोडे असणार आणि त्यांनीं निर्माण करावयाचीं केंद्रें कमी असणार; पण लहान धंद्यांचीं केंद्रें अधिक असतील.

## विकेंद्रियीकरणाच्या मर्यादा

मोठ्या धंद्यांमध्यें ठराविक केंद्रांमध्यें चिकटण्याची प्रवृत्ति अधिक असते आणि छोट्या धंद्यांत ती कमी असते असें मानण्याकडे कल असतो. तोहि फारसा खरा नसावा. आधींच वाढलेल्या केंद्राकडे ओढ घेण्याची प्रवृत्ति ही एखाद्या धंद्याच्या आकारावर अवलंबून असण्यापेक्षां त्या धंद्याच्या स्वरूपावर अवलंबून असते. धंदा आकारानें मोठा असला तर त्यास खरेदीविक्रीसाठीं मोठी बाजारपेठ हवी आणि ती बाजारपेठ मोठ्या औद्योगिक शहरीं असते हें खरें. पण बाजारपेठ विखुरलेली असली (उदा० औषधांचें गिऱ्हाईक) आणि दळणवळणाचीं साधनें उपलब्ध असलीं तर धंद्याच्या मोठ्या आकारामुळें तो धंदा जुन्या केंद्राकडेच जाईल असें समजण्याचें कारण नाहीं. विकेंद्रीयीकरणासाठीं उपयोगी पडणारे धंदे कोणते ते शोधून काढून, ते लहान असोत वा मोठे असोत, नव्या ठिकाणीं वसविले पाहिजेत. ह्या कामीं, लहानमोठ्यांपैकीं लहानांना अधिक पसंती द्यावयाची असली तर दुसऱ्या एखाद्या कारणासाठीं द्यावी लागेल!

विकेंद्रीयीकरणाचा दुसराहि अर्थ लावला जातो: धंद्यांची मालकी आणि सत्ता वांटली जाणें. लहान धंदे लहान राहिले आणि मोठ्या धनिकांनीं अनेक लहान धंदे हातीं घेतले नाहींत तरच लहान धंद्यांमुळें मालकीची वांटणी होते. सध्यां ह्या बाबतींत कशी उलटी प्रेरणा आहे त्याचा उल्लेख वर येऊन गेला. मालकीबद्दल जें खरें तेंच मालकीनें येणाऱ्या सत्तेबद्दल.

मोठा धंदा मक्तेदार बनतो आणि त्यामुळें सत्ता येते. लहान धंदासुद्धां मक्तेदार बनतो! औषधांचे कारखानदार अनेक असून त्यापैकीं प्रत्येकजण लहान असला तरी त्यांच्या औषधांची स्पर्धा होतेच असें नाहीं. डॉक्टरकडून आपण एखादें शक्तिवर्धक विचारून येतो आणि डॉक्टर कागदावर नुसतें B Complex असें लिहून न देतां अमुक कारखान्याची अमुक नांवाची बाटली (उदा. Squibb कंपनीची phosfomin) असें लिहून देतो. ह्या बाटलीची किंमत फार वाटली तर दुसरें पर्यायी शक्तिवर्धक घेण्यास आपण कोठें मोकळे असतों? ह्या अर्थानें एखाद्या धंद्याला मक्तेदारी नसली तरी गिऱ्हाइकांच्या दृष्टीनें दुसऱ्या घटनेमुळें ती असल्याचें अनुभवास येतें. ती घटना अशी कीं औषधांचे दुकानदार (कारखानदार नव्हे) आपली संघटना बनवून किंमती बांधून घेतात. निष्कर्ष असा कीं समाजाच्या व्यवहाराचीं तत्त्वें आणि व्यवहाराचें संघटन आहे तसेंच राहिलें तर लहान उत्पादक किंवा विक्रेता ह्यामुळें समाजाचा फायदा होईल तो फक्त मर्यादित असणार.

## खबरदारी

लहान परिमाणावरील धंद्यांचे फायदे सांगून त्यांच्या मर्यादा सांगितल्या व अवास्तव उत्साहावर बंधन म्हणून – किंवा वास्तवदर्शन म्हणून – आणखी कांहीं गोष्टी सांगितल्या पाहिजेत. (१) महाराष्ट्रांत भांडवल कमी असल्यामुळें महाराष्ट्राचें औद्योगिकीकरण मुख्यतः लघु धंद्यांनीं केलें पाहिजे असें म्हटलें जातें–तेंहि आवर्जून. महाराष्ट्रांतील मोठ्या धंद्यांसंबंधीं मुख्यतः दोन आक्षेप आहेत. एक असा कीं, हे धंदे बिगरमहाराष्ट्रीयांच्या हातीं असल्यामुळें महाराष्ट्रीय समाजाच्या नाड्या त्यांच्याकडे आहेत.[1] दुसरा आक्षेप असा कीं हे बिगरमहाराष्ट्रीय धनिक (व्यापारी आणि कारखानदार) आपलें आसन स्थिर ठेविण्या-

---

१. महाराष्ट्रांत वैश्य वर्ग अत्यल्प असल्यामुळें महाराष्ट्राच्या आर्थिक जीवनावर बिगर महाराष्ट्रीयांचें वर्चस्व आहे हा सर्वमान्य मुद्दा झाला आहे. अगदीं अलीकडे श्री. प्रभाकर पाध्ये यांनीं 'मौजे' च्या महाराष्ट्र विशेषांकांत ह्या मुद्याचा उल्लेख केला आहे.



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

साठीं येथील समाजांत (जातींत) भांडणें लावून देतात.[२] यापैकीं दुसरा आक्षेप किती खरा आहे त्याबद्दल प्रस्तुत लेखकास कांहींच अनुभव नाहीं. पहिला आरोप खरा असल्याचें मागें (१९५५ सालीं) राज्यपुनर्रचनेच्या वेळीं सिद्ध झालें. ह्या दोन्हीं आक्षेपांस उत्तर (मागें सांगितल्याप्रमाणें) असें कीं धनिकांची सत्ता ही बरीचशी लोकशाहीच्या जाणीवेच्या दौर्बल्याची खूण आहे. दुसरें असेंहि म्हणतां येईल कीं धनिक सत्ता गाजवूं लागला तर तो आपला आणि परका असा विशेष फरक राहत नाहीं.

भांडवल परदेशांतून येऊं दिलें जातें तर एका राज्यांत दुसऱ्या राज्यांतून आलें तर काय बिघडतें? धंद्यांचें अर्थशास्त्र असें सांगतें कीं धंदे एकामुळे दुसरा अशा न्यायानें वाढतात. बिगर महाराष्ट्रीय धनिकांनीं मोठे धंदे काढल्यानें महाराष्ट्रीयांना इतर लहानमोठे धंदे काढण्यासारखी परिस्थिति निर्माण होते. आपल्याकडे पुरेसें भांडवल नाहीं म्हणून एखाद्या देशानें जशी आपली औद्योगिक वाढ थांबवून धरूं नये त्याचप्रमाणें त्या देशांतील एखाद्या राज्यानें (म्हणजे, महाराष्ट्रानें) इतकेंच काय पण महाराष्ट्रांत धंद्यांना अनुकूल क्षेत्र असलें तर बिगरमहाराष्ट्रीय धनिक महाराष्ट्राचा अनुनय करतांनाहि दिसतील! (तसें घडण्याचीं चिन्हें दिसत आहेत).

समाजवादी महाराष्ट्राची उभारणी करण्यासाठीं मोठ्या धंद्यांपेक्षां लहान धंद्यांस उत्तेजन द्यावें असा कार्यक्रम मांडणारी कांहीं मंडळी आहेत. समाजवादाचें मोठ्या धंद्यांशीं वैर असल्याचें कारण म्हणजे लहान माणसाची गळचेपी हेंच होय. सामान्य माणसाचें महत्त्व टिकविण्यासाठीं दुसरे उपाय असले तर समाजवाद धंद्यांच्या मोठ्या आकाराला आक्षेप घेणार नाहीं, हे धंदे राष्ट्राच्या मालकीचे करील इतकेंच. आणखी हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं देशांतील एखादेंच राज्य समाजवादी करणें शक्य नसतें. राज्य अधिकारारूढ पक्ष चालवितो आणि त्याचें (समाजवादाला अनुकूल वा प्रतिकूल) असें धोरण सबंध देशाच्या पातळीवरून ठरतें.

ह्यावरून अशी खबरदारीची सूचना द्यावीशी वाटते कीं महाराष्ट्रांत लहानधंदे जरूर वाढले पाहिजेत, परंतु त्यांचा पुरस्कार करतांना मोठ्या धंद्यांशीं वैर दाखवूं नये.

(२) इतकेंच नव्हे तर एकंदर औद्योगिकीकरणावर फार जोर देणें हेंहि धोक्याचें आहे. 'नवें राज्य, नवें धोरण' असें होणें साहजिक आहे. पण नवें धोरण सर्व बाजूंनीं विचार करून आंखावयास हवें. धंद्यांवर फाजिल जोर दिला तर सरकारी यंत्रणा शेतीआदि इतर कार्यक्रमांकडून धंद्यांच्या वाढीकडे तोंड वळविते. शेतीचा प्रश्न अतिशय मोठा आणि बिकट. तो सोडवितांना सरकारी यंत्रणा आधींच अपयशी ठरली आहे. अपयशाच्या कारणांत पुढें भर पडूं नये.

औद्योगिक विकासाच्या दमदार कार्यक्रमांत नागरिकांच्या हिताकडे दुर्लक्ष होण्याचा बराच संभव आहे. वीज नागरिकास कमी देऊन धंद्यास उपलब्ध करून देणें, इंडस्ट्रिअल इस्टेटसाठीं धंद्यांना गांवाजवळची जागा देऊन नागरिकांस दूर राहण्याची पाळी आणणें, ऑक्ट्राय कर माफ करून धंद्यांना उत्तेजन देणें आणि त्या पैशांतून नागरिकांना मिळणाऱ्या सुखसोईंत खड आणणें अशीं अनेक उदाहरणें सहज दिसण्यासारखीं आहेत.

(३) लहान धंदे काढण्यासाठीं उत्तेजन दिलें, ते धंदे निघाले म्हणजे 'सर्व ठीक' होईल असें मानणें भाबडेपणाचें आहे. चालू समाजरचनेंत कोणताहि धंदा निरुपद्रवी असूं शकत नाहीं. कांहीं छोट्या धंद्यांना मिळणाऱ्या सरकारी कर्जाचा दुरुपयोग होतो. एक साधें उदाहरण घ्या. लहान कारखानदार शेतकऱ्यांस लागणारीं डिझेल इंजिनें तयार करतात त्यांच्यापैकीं कांहींना सरकारी मान्यता मिळते आणि शेतकऱ्यास मिळणारी तगाई त्या सरकारमान्य इंजिनावर मिळते. शेतकऱ्यास कनवटीचे पैसे काढून लगेच द्यावे लागत नसल्यामुळें कितीहि किंमतीनें तो (तगाईच्या बदल्यांत) इंजिन खरीदावयास तयार असतो. त्यामुळें इंजिनांचे दर कडाडले! (गेल्या वर्षीं सरकारनें ह्या इंजिनांच्या उत्पादनावर आणि इतर कांहीं लहान धंद्यांवर कर लादून धाष्टर्य दाखविलें; पण लहान धंद्यांच्या निष्पाप मालकांनीं इंजिनाच्या किंमती आणखी वाढवून ठेविल्या. (विक्रीवरील कर जशास तसा गिऱ्हाइकांवर टाकण्याची

२. 'नवभारत' मासिक, जुलै १९६० च्या अंकांत श्री. चिकित्सक यांचा लेख.










अनुक्रमणिका

सरकारमान्य सोय झाल्यापासून सर्वच कर गिऱ्हाइकांवर टाकण्याची प्रथा रूढ होत आहे ).

लोकशाहीच्या प्रेमानें, लहान माणसाविषयीं वाटणाऱ्या साहजिक आपुलकीमुळें आणि उत्साहानें लघु धंद्यांविषयीं जे भ्रम रूढ आहेत आणि जे धोके संभवतात त्यांचें वर विवरण केलें. ह्या धंद्यांची नेमकी भूमिका काय तेंहि स्पष्ट केलें. यापुढें लघु धंद्यांना उत्तेजन देण्यासाठीं कोणता किमान कार्यक्रम आखावा तें पाहायला हवें. कार्यक्रमाच्या बाबतींतसुद्धां, अति-उत्साहामुळें स्वीकारलेले कांहीं कार्यक्रम व्यवहाराच्या कसोटीवर कमी महत्त्वाचे ठरवावे लागतील.

(१) इंडस्ट्रिअल इस्टेट : ठिकठिकाणीं इंडस्ट्रिअल इस्टेट सरकारकडून स्थापन केल्या जातात. कांहीं गांवांना केंद्र होऊं शकेल अशा ठिकाणीं मोठी उघडी जागा निवडून त्या ठिकाणीं धंद्यांना उपयुक्त अशा सोई पुरविल्या जातात. छोट्या कारखान्यांसाठीं गाळे बांधतात, वीज पुरवितात, यंत्रें दुरुस्त करण्यासाठीं वाकब माणसें नेमतात, पाण्याची सोय असते, पोस्टाची सोय असते, टेलिफोनची सोय असते इत्यादि. ही सोईंची यादी कमीजास्त करतां येईल. अशा सोई मिळाल्या म्हणजे धंद्यांना हवें असणारें साहित्य किंवा कार्य हाताशीं उपलब्ध होतें, तें जुळविण्याची यातायात नको, आणि सरकार ह्या सोई स्वतः तोटा सोसून देत असतें.

इंडस्ट्रिअल इस्टेटच्या उपयुक्ततेसंबंधीं शंका नाहीं. पण जो खर्च करून ही इस्टेट उभारली जाते त्या खर्चाच्या मानानें उपयुक्तता कमी असते. कांहीं सोयी असण्याची आवश्यकताहि नसते. कांहीं ठिकाणीं मोठी जमीन धंद्यांना उपलब्ध करून, त्यांना वहातुकीच्या सवलती दिल्या तर बाजारपेठेची शाश्वती असल्यावर नवे धंदे उभे राहतील. बाजारपेठेची खात्री नसली तर सगळ्या सोई देऊनहि धंदे निघत नाहींत. गाळे बांधून देण्यापेक्षां धंदे काढूं इच्छिणाऱ्यांना त्यांच्या सहकारी सोसायटीतर्फे कारखाने बांधण्यास कर्ज देणें बरें. ज्याच्या त्याच्या सोईप्रमाणें तो कारखाना बांधूं शकतो आणि मुदतीच्या कर्जफेडीनें ती इमारतहि त्यांची होऊं शकते. कोल्हापूर येथील ' उद्यमनगराचा' धडा ह्या दृष्टीनें घेण्यासारखा आहे.

(२) वीज : प्रगतीला, विशेषतः औद्योगिक प्रगतीसाठीं, वीज अत्यावश्यक आहे असें समजण्यांत येतें. रशियामधील लेनिननें विजेला अग्रहक्क दिलेला कार्यक्रमहि उदाहरणासाठीं सांगण्यात येतो. पण आमच्या देशांत धबधब्यावर तयार केलेली वीज खूप अंतरावरून न्यावी लागते आणि लहान गांवीं वाफेवरील किंवा तेलावरील वीज तयार करणें खर्चाचें असतें ह्या गोष्टी विसरून चालणार नाहींत.

धंद्यांत प्रेरकशक्ति (power) वापरतांना दोन प्रकारें खर्च येतो : ती प्रेरकशक्ति वापरण्यासाठीं जीं साधनें योजावीं लागतात तीं साधनें विकत घेण्याचा खर्च आणि त्या प्रेरकशक्तीचा खर्च. धंद्यांत वीज वापरली तर हे दोन्ही खर्च त्या धंद्याच्या दृष्टीनें कमी असतात. परंतु विजेचा पुरवठा करण्याचा सरकारला पडणारा खर्च प्रचंड असतो. एवढा खर्च खरोखरच करावयास हवा आहे काय त्यांचा काळजीपूर्वक विचार व्हावा.

जेथें धंदे किफायतशीर आहेत तेथें वीज मिळाली नाहीं तरी डिझेल इंजिन लावून धंदे चालविलेले दिसतात. सरकारनें विजेचा पुरवठा करण्यासाठीं भरमसाट खर्च करण्यापेक्षां डिझेल इंजिनें पुरविणें हा पर्यायी मार्ग कांहीं वेळां कमी खर्चाचा दिसेल. वीज वापरण्यासाठीं इलेक्ट्रिक मोटर ८०० रु. किमतीची वापरावी लागते, त्याऐवजीं २००० रु. किमतीचें डिझेल इंजिन वापरणें, सरकारी मदत मिळाली तर धंद्यांना अवघड वाटूं नये.

वीज आणल्यानें गांवांत लख्ख दिसतें आणि शेतीवर पंप बसवितां येतात असें आणखी फायदे दिसतात. प्रत्यक्षांत असें आढळतें कीं लहान गांवीं वीज वापरणारे सर्वच असंतुष्ट असतात. ग्रामपंचायतीच्या उत्पन्नाच्या मानानें रस्त्यावरील दिव्यांसाठीं विजेवर फार खर्च होत असल्यामुळें तेथील कांहीं कार्यकर्ते तक्रार करतात. हवी त्यावेळीं वीज मिळत नाहीं म्हणून शेतकरी तक्रार करतात. वीज गेली तर बराच वेळ दुरुस्त होत नाहीं म्हणून घरांत वापर करणारी मंडळी असंतुष्ट असते. ग्रामपंचायतीच्या कांहीं कार्यकर्त्यांना गांवांत झगझगाट करावयाचा होता, आणि ग्रामपंचायतीखेरीज आणखी अमुक इतके ग्राहक मिळाल्यावाचून वीज मिळणार नाहीं अशी अट








असल्यामुळें त्या कार्यकर्त्यांनीं आम्हांला वीज घेणें भाग पाडलें असें सांगणारीं माणसें भेटतात !

(३) कोणत्याहि सरकारी कार्यक्रमाची सुरवात अधिकारी नेमून होते. लहान धंद्यांना खऱ्या अर्थानें मदत करणारे अधिकारी क्वचित् दिसतात. त्याचें कारणच असें कीं धंद्यांना मदत करणें हें भलत्याचें काम नव्हे. विशेषतः कचेरींतील इतर कामासारखें हें काम असा समज असणाऱ्या माणसाचें हें काम नव्हे.

धंदे कोणते काढावे हें फारसें सांगावें लागत नाहीं. जवळपासच्या कच्च्या मालाचा उपयोग करून आणि नजिकच्या बाजारपेठांचा उपयोग करून कोणता धंदा काढतां येईल हें सरकारी अधिकाऱ्यांनीं सांगावें लागत नाहीं. कांहीं धंदे केवळ माणसांच्या अनुभवांतून सहज निर्माण होतात. कोल्हापुरला असा एक धंदा आहे कीं तेथें पुण्याहून ॲल्युमिनिअमचे टोप आणले जातात आणि यंत्रांवर त्याचा आकार बदलला जातो. सपाट तळ आणि त्याच्याशीं काटकोनांत असणाऱ्या बाजू ऐवजीं तळाला अर्धगोलाचा आकार दिला जातो आणि बाजू त्रिकोणासारख्या आंतल्या बाजूस वळविल्या जातात. हा नवा आकार दिसावयास अधिक बरा दिसतो आणि गोल तळाला तापण्यास जळण कमी लागतें. हा धंदा कोणत्या अधिकाऱ्यानें सुचविला असता ?

सरकारी अधिकाऱ्यांनीं आपली नुसते कागद चाळविण्याची प्रवृत्ति सोडावी. धंद्यांना कायद्यांत असलेली मदत कशी आणून द्यावयाची त्याचा विचार करावा. धंद्यांच्या खऱ्या अडचणी त्वरित वर कळवाव्या आणि त्यावर निर्णय घ्यावे. त्यांनीं आपली कल्पना चालवावी, धंद्यांचे प्रश्न समजावून घ्यावे आणि वर सूचना कराव्या असें स्वातंत्र्य त्यांना देण्यांत यावें.

(४) सरकारच्या खरेदीविषयक धोरणांतहि मोठा दोष आहे. छोटया धंद्यांना उत्तेजन मिळावें म्हणून सरकार त्यांच्याकडून कांहीं वस्तु खरेदी करतें. त्यांत दोष उद्भवतो त्याचें कारण असें कीं सरकारी खरेदी मध्यवर्ती संघटनेमार्फत केली जाते. ठिकठिकाणीं ज्या सरकारी कचेऱ्या आहेत त्यांनीं आपल्या गरजा ह्या मध्यवर्ती संघटनेला कळवावयाच्या. त्यानंतर त्या गरजा एकत्र करून, ही मध्यवर्ती संघटना टेंडरें मागविते. त्या टेंडरांसाठीं वस्तूचें जें वर्णन दिलें जातें तें एखाद्या मोठ्या कारखानदाराच्या वस्तूकडे पाहून दिलेलें असतें. त्यामुळें त्यानें पाठविलेलें टेंडर अधिक स्वीकारार्ह ठरतें. ह्या टेंडरांप्रमाणें माल मोठया परिमाणांत पुरवावयाचा असतो. छोटा कारखानदार एवढया परिमाणावर पुरवठा करूं शकत नाहीं त्यामुळें तो मागें राहतो. त्यावर इलाज असा कीं, जेथें ज्या वस्तु चांगल्या प्रकारें छोटया धंद्यांकडून निर्मिल्या जातात अशी माहिती असते तेथील सरकारी खात्यांना तेथेंच खरेदी करण्याचें स्वातंत्र्य द्यावें. उदा. कोल्हापूर येथें लोखंडी फर्निचर चांगलें होतें, म्हणून ह्या जिल्ह्यांतील सरकारी खात्यांनीं येथूनच लोखंडी फर्निचर घ्यावें.

मध्यवर्ती खरेदीच्या दोषासारखाच दोष दुसऱ्याहि एका घटनेमुळें उद्भवतो आहे. ती घटना म्हणजे कांहीं धंद्यांचें राष्ट्रीयीकरण. पूर्वी हे धंदे ( उदा. बस् ट्रॅन्सपोर्ट आणि वीज पुरवठा ) खाजगी मालकीचें असतांना बऱ्याच ठिकाणीं विखुरलेले असत आणि त्यांना लागणारें सामान किंवा काम त्या त्या ठिकाणीं लहान कारखान्यांतून घेतलें जाई. ह्या धंद्यांचें राष्ट्रीयीकरण झाल्यावर त्यांनीं स्वतःचे कारखाने उभे केले किंवा त्यांनीं मोठ्या कारखानदारांशीं कंत्राटें केलीं. लहान लहान ठिकाणीं लहान लहान कारखानदारांना मिळणारीं कामें (उदा० दुरुस्तीचीं) आज त्यांना मिळत नाहींत. पूर्वी कोल्हापूर येथें मोटार दुरुस्तीचे कित्येक लहान कारखाने होते पण एस्. टी. झाल्यापासून ते कमी झाले आहेत. राष्ट्रीयीकरणामुळें जे असे परिणाम होतात त्यांचा अजून विचार झालेला दिसत नाहीं.

(५) मोठ्या कारखानदारांनीं त्यांना लागणारे वस्तूचे कांहीं सुटे भाग लहान कारखानदारांकडून घेतले तर तें दोघांच्याहि फायद्याचें असतें. मोठ्या कारखानदारांनीं अधिक महत्त्वाचे, किफायतीचे किंवा उत्पादनक्रियेंत एकमेकावर अवलंबून असणारे वस्तूचे भाग तयार करावे आणि बाकीचे भाग पुरविण्याचें काम लहान उत्पादकांकडे सोपवावें. ह्यास Subcontracting असें म्हणतात. 'म्हैसूर किर्लोस्कर' कारखाना लेथ (Lathe) तयार करतो. आणि त्यासाठीं लागणारे कांहीं भाग ( उदा. pulley ) कोल्हापूरचा एक छोटा कारखानदार तयार करतो. लहान कारखानदारसुद्धां आपसांत सब्-कॉन्ट्रॅक्टिंग करीत असतात. डिझेल इंजिनचे








जवळजवळ १२० भाग असून ते सगळे एकच कारखानदार तयार करीत नसून अनेक कारखानदार तयार करतात असें कोल्हापूर येथें आढळतें.

मोठया कारखानदारांना जेथें सबूकॉन्ट्रॅक्टिंग करतां आलें असतें पण त्यांनीं केलेलें नसतें तेथें त्यांना तें करावयास लावावें. सबूकॉन्ट्रॅक्टिंगमध्यें मुख्य अडचणी येतात त्या अशा : (अ) लहान कारखानदाराकडे तज्ज्ञ माणसें नसतात. (आ) लहान कारखानदारांनीं तयार केलेले सुटे भाग कोणते आहेत, ते कोणत्या दर्जाचे आहेत वगैरे माहिती मोठया कारखानदारांना नसते. (इ) मोठया कारखानदारांना सबूकॉन्ट्रॅक्टिंग कोणत्या बाबतींत करतां येईल तें छोटया धंद्यांना माहिती नसते. त्या सर्व उणीवा लगेच दूर करतां येतील. सरकारी अधिकारी ह्या सर्व बाबतींत उपयोगी पडतील. मोठया कारखानदारांनीं आपलीं तज्ज्ञ माणसें पाठवून लहान धंद्यांना माहिती करून द्यावी आणि त्यांच्याकडून हवें त्याप्रमाणें काम करून घ्यावें.

(६) धंद्यांना मदत म्हणून ऑक्ट्राय कर काढून टाकावा असें महाराष्ट्राच्या मुख्य मंत्र्यांनीं कांहीं महिन्यापूर्वी लोणावळा येथील नगरपालिकेंत सांगितलें. त्यानंतर कांहीं ठिकाणीं (उदा., मिरज, सांगली) ऑक्ट्राय काढून टाकण्याची हालचाल झाली. धंद्यांना साहाय्य म्हणून ऑक्ट्रायचें उच्चाटन प्रस्तुत लेखकास इष्ट वाटत नाहीं.

नगरपालिकेच्या हद्दींत जी मालाची आवक होते त्यावर ऑक्ट्राय कर घेतला जातो. त्यामुळें तो माल वापरून जो पक्का माल तयार केला जातो त्याचा उत्पादन खर्च वाढतो. पण ही उत्पादनखर्चांतील वाढ एकंदर खर्चाच्या मानानें अतिशय अल्प असते. इतकेंच नव्हे तर ऑक्ट्रायमुळें उत्पादनखर्चांत होणारी ही वाढ कारखानदार संपूर्णपणें सहन करीत असतो असें नाहीं. त्यांतील कांहीं भाग तो विकावयाच्या वस्तूची किंमत वाढवून गिऱ्हाईकावर टाकीत असतो. त्यामुळें ऑक्ट्राय काढल्यानें कारखानदाराला जो फायदा मिळेल तो अल्प असतो.

ऑक्ट्राय काढल्यावर कारखानदाराच्या विक्रीवस्तूची किंमत कमी होईल असेंहि नाहीं. हा भाववाढीचा काळ ( inflationary period ) आहे. अशा काळांत वस्तूच्या किमती कमी होण्याची शक्यता नसते. कारखानदाराच्या विक्रीवस्तूची किंमत कायम राहील आणि ऑक्ट्राय काढल्याचा सबंध फायदा त्याच्या खिशांत पडेल. ऑक्ट्राय काढण्यामागें कारखानदाराचा फायदा वाढवावा असा हेतु आहे कीं त्याच्या वस्तूची किंमत खालीं यावी आणि त्यामुळें मागणी वाढून त्याचें उत्पादन वाढावें असा हेतु आहे ?

ऑक्ट्रायचें उत्पन्न फार मोठें आहे. कोल्हापूर नगरपालिकेच्या उत्पन्नापैकीं ५०-५५ % उत्पन्न ऑक्ट्रायमधून मिळतें. हें उत्पन्न घटलें तर नागरिकांना मिळणाऱ्या अनेक सोईंना फाटा द्यावा लागेल. धंद्यांच्या फायद्यासाठीं नागरिकांवर हा त्याग लादावा असें वाटत नाहीं. ह्यांतील कांहीं फायदे धंद्यांनासुद्धां मिळत असतातच. ऑक्ट्राय काढून दुसरे कर लादणें आज शक्य नाहीं. दुसऱ्या करांमुळें कदाचित अधिक तोटे होतील.

कांहीं वर्षांपूर्वी कर-चौकशी-मंडळानें जो निष्कर्ष काढला आहे तो आपण लक्षांत घ्यावा. तो असा: " On any except a long range view of situation, it is not practicable to envisage wholesale abolition of octroi. It is abvious that, unless adegnate alternative sources are developed by or for local bodies, such a course will have extremely adverse effects on several municipalities and mnnicipal corporations ".

ऑक्ट्राय सबंध न काढतां पुढील सुधारणा कराव्या: (अ) विविध नगरपालिकांमध्यें ऑक्ट्रायचे दर वेगळे आहेत. नजिकच्या (उदा. कोल्हापूर, सांगली) नगरपालिकांत असें घडलें तर तेथील नगरांची धंदेवाढींत अनिष्ट स्पर्धा संभवते. म्हणून ह्या नगरपालिकांत ऑक्ट्राय बाबत समानता आणावी. (आ) सबकॉन्ट्रॅक्टिंगला उत्तेजन देण्यासाठीं ऑक्ट्राय काढावा. उदा. कोल्हापुरच्या मोठया कारखान्यानें इचलकरंजीच्या लहान धंद्याकडून कांहीं माल घडवून आणला तर कोल्हापुरांत जो ऑक्ट्राय घेतला जाईल तो नंतर परत केला जावा.










अनुक्रमणिका

( ७ ) वाहतुकीच्या साधनांची मोठी टंचाई भासत आहे. धंद्यांना लागणारा माल बाहेरून आणावयास रेल्वे अपुरी पडते आणि बराच उशीर लागतो. जेथें एका रेल्वे फाट्यावरून माल उतरून दुसऱ्या फाट्यावर चढवावा लागतो ( trans–shipment ) तेथें ह्या अडचणी विशेष जाणवतात. रेल्वेची वाहतूक वाढविणें आज अवघड दिसतें. म्हणून रस्त्यांची वाहतूक लगेच वाढवावी. त्यासाठीं खासगी क्षेत्रांत मोटर ट्रकचे परवाने अधिक द्यावे. हे परवाने लहान मालकास देणें अधिक योग्य.

( ८ ) लहान धंदेवाल्यांनीं नुसतें सरकारकडे पाहूं नये. सांघिक रीतीनें आपण आपल्या अडचणी किती दूर करतो त्याचा त्यांनीं जरूर विचार करावा. लहान कारखानदारांचे संघ केवळ नाममात्र असतात असें खेदानें म्हणावें लागतें. त्यानीं चांगले कार्यकर्ते नेमावे आणि बरींच कामें अंगावर घ्यावीं. कांहीं कामें अशीं : ( अ ) धंद्यांना उपयुक्त अशी जी विपुल माहिती सरकारकडून किंवा इतर संघटनांकडून इंग्रजींतून येत आहे ती वेंचून थोडक्यांत, सुबोध मराठींत तयार करावी आणि ‘ सदस्यांना ’ वाटावी. ( आ ) सरकारी कायदे सदस्यांना समजावून सांगावे. सरकारी परवाने कसे उपयोगांत आणावे त्या बाबत मार्गदर्शन करावें. ( इ ) मोठ्या कारखानदारांकडून काम मिळावें म्हणून त्यांना आपल्या सदस्यांनीं बनविलेल्या मालाची काटेकोर माहिती द्यावी. ( ई ) सदस्यांनीं तयार केलेल्या वस्तूची एकत्र जाहिरात करून त्याची मागणी वाढवावी. ( टी बोर्ड चहाची जाहिरात करते त्याप्रमाणें ). सरकारहि ह्या संघांना मदत करूं शकेल. उदा. कार्यक्षम कार्यकर्ते ह्या संघांनीं नेमण्यासाठीं सरकारनें आर्थिक साहाय्य द्यावें.

वर जो कार्यक्रम मांडला तो स्थूल स्वरूपाचा आहे. तो अधिक तपशीलवार करावयास हवा. परंतु ह्या कार्यक्रमावर निदान एवढें कळावें कीं कांहीं कार्यक्रम केवळ परवलीच्या शब्दासारखे आपण घोकतो त्यांच्याविषयीं व्यवहाराच्या पातळीवर अधिक विचार करणें जरूरीचें झालें आहे.

## मदतकार्याची मर्यादा

शेवटीं हें स्पष्ट केलें पाहिजे कीं लहान धंद्यांना उत्तेजन देण्यासाठीं कोणताहि कार्यक्रम आंखला तरी त्यांच्या उपयुक्ततेंत कांहीं मर्यादा अपरिहार्यपणें राहणार. धंदे वाढण्यासाठीं जी अनुकूल परिस्थिति लागते ती कांहीं अंशीं सबंध आर्थिक संघटनेवर अवलंबून असते. उदा., एखाद्या वस्तूसाठीं मागणीचें अस्तित्व. ही परिस्थिति सुट्या कार्यक्रमानें फारशी बदलतां येत नाहीं. कांहीं अडसर दूर करणें हेंच अशा कार्यक्रमाचें यश होय. ह्या कार्यक्रमामुळें कोणताहि धंदा, कोणत्याहि ठिकाणीं उभा करूं शकूं ही आकांक्षा खोटी आहे. एक नित्य परिचयाचें उदाहरण घ्या. मुंबईच्या जवळ कल्याण वगैरे भागांत तेथील लोकसंख्येच्या मानानें ‘ कपडे धुलाई ’ वगैरे धंदे वाढलेले दिसत नाहींत. कल्याणचीं माणसें मुंबईस पैसा मिळविण्यास ( नोकरी करण्यास ) जातात आणि तेथून मालाची खरेदी करून येतात ( उदा., कपडे धुवून आणतात ). कोल्हापूरसारख्या शहरांत बाजूच्या गांवांतून दूध, अंडीं, धान्य विकण्यासाठीं ( विशेषतः आवडयाच्या बाजारासाठीं ) माणसें येतात आणि तेथेंच खरेदी करून जातात. मुलांना शाळेंत पुस्तकें न्यावयाची पिशवी खेडयांतील शिंपी तयार करूं शकतो, पण ती पिशवी कोल्हापुरांत खरेदी केली जाते. मोठया शहरांत खरेदी करावयाची ही वृत्ति कोण हटवूं शकेल ? खेडें आणि शहरें यामधील दळणवळण वाढविल्यावर परिणाम असा दिसतो कीं खेडयांतील कच्चा माल शहरांत विकला जातो आणि शहरांतच कारखानदारी माल खरीदला जातो. पैसा पुन्हा खेड्यांत जाऊन तेथें कारखानदारी वाढविली जात नाहीं. ह्यावरून बराच बोध घेण्यासारखा आहे.








तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# मास्को येथील प्राच्यविद्या विशारदांची विश्वपरिषद

या परिषदेचें २५ वें अधिवेशन मास्को येथें ९ ते १६ ऑगस्ट १९६० या तारखांना भरलें होतें. या परिषदेस भारतांतील सुमारें ४० प्राच्य-विद्यापंडितांना सदस्य या नात्याने उपस्थित रहाण्याकरितां निमंत्रणें आलीं होतीं. मला हें निमंत्रण गेल्या १७ फेब्रुवारीला मिळालें. हें आमंत्रण मला कांहीसें अनपेक्षित वाटलें. मी स्वतः प्राच्यविद्येचा दीर्घकाल-पर्यंत अध्ययन करणारा विद्यार्थी असलों तरी मी भारतीय प्राच्य-विद्या-परिषदेला क्वचितच उपस्थित राहिलों असेन; म्हणून मला हें आमंत्रण अनपेक्षित वाटलें. धर्मकोशाचे ८ भाग मास्को-लेनिनग्राडच्या प्राच्य-विद्या पंडितांपर्यंत जाऊन पोचले असावेत याचीच पोच म्हणजे हें आमंत्रण होय, असें मास्कोला गेल्यावर नंतर माझ्या लक्षांत आलें. मार्क्सवादाचें कट्टर धर्मक्षेत्र असलेल्या मास्कोमध्यें ही परिषद भरली जाणार याचें मला आश्चर्यच वाटलें. कारण प्राच्यविद्येचे देशोदेशींचे बरेचसे विद्यमान पंडित हे कांहीं मार्क्सवादी नाहींत; निदान त्यांतील बहुसंख्य पंडित मार्क्सवादी नाहींत. या बिनमार्क्सवादी पंडितांच्या बरोबरीने कट्टर मार्क्सवादी पंडित चर्चा करण्यास व विचारविनिमयास तयार झाले, हें तर मला विशेष सूचक वाटलें. प्राच्यविद्या म्हणजे प्रामुख्याने इतिहास-विद्याच होय. प्राची ही अतिप्राचीन विविध संस्कृतींचें माहेरघर होय. गेल्या सहा हजार वर्षांचा अनेक प्रगल्भ संस्कृतींचा इतिहास प्राच्य-देशांतच घडला. या इतिहासाचें अध्ययन व संशोधन गेलीं १५० वर्षे प्रामुख्याने पाश्चात्य व विशेषतः युरोपीय पंडितांनी चालविलें आहे व प्राच्य देशीय पंडित पाश्चात्यांचा मागोवा घेत त्यांत मागाहून शिरले आहेत. यांत मुख्य भरणा बिनमार्क्सवाद्यांचा आहे.

ही परिषद मास्को येथें भरविण्याचें सोविएटच्या प्राच्यविद्या विशारदांच्या संस्थेनें ठरविल्यानंतर या परिषदेसंबंधी अपेक्षा व्यक्त करणारे दिग्दर्शक-लेख सोविएट देशांच्या पंडितांनी प्रसिद्ध केले. त्यांत बी. जी. गफुराव् या प्राच्यविद्या विशारद सोव्हिएट पंडिताने आपल्या लेखांत असें एक महत्त्वाचें विधान केलें कीं, " पाश्चात्यांचे प्राचीच्या बाबतींत दोन विरुद्ध प्रकारचे दृष्टिकोण आहेत. पहिला दृष्टिकोण म्हणजे निःस्वार्थ बुद्धीने व मानवी सहानुभूतीने प्राचीच्या सांस्कृतिक मूल्यांचें अध्ययन करण्याचा होय; दुसरा दृष्टिकोण म्हणजे प्राच्य देशांतील भौतिक समृद्धीवर डोळा ठेवून विचार करावयाचा. १८ व्या, १९ व्या, व २० व्या शतकांमध्यें या दोन दृष्टिकोणांचा संघर्ष निरंतर झालेला जागतिक प्राच्य विद्येच्या परिसरांत आढळून येतो. वर्तमान काळीं आशिया आणि आफ्रिका या खंडांतील देश ज्या क्रमानें व ज्या प्रमाणांत जीवनाच्या सर्व क्षेत्रांत स्वातंत्र्य प्राप्त करून घेत आहेत त्या प्रमाणांत प्राचीमध्यें नव जीवनाचा आविर्भाव झालेला दिसूत येत आहे. "

गफुरॉवनें आपल्या लेखांत अखेरीस असें म्हटलें कीं, " ही विश्वपरिषद एक महत्त्वाचें कार्य साधणार आहे; त्यामुळें जगांतील निरनिराळया देशांतील विद्वान लोक व सोव्हिएट शास्त्रज्ञ यांचा संबंध घनिष्ठ बनेल. परस्परांच्या संशोधनाचा अधिक निकटच्या सहकार्याने अभ्यास होऊं लागेल. या परिषदेंत आमची मार्क्स-लेनिनवादी पद्धति कोणाहि



अनुक्रमणिका








पंडितावर लादण्याचा प्रयत्न होणार नाहीं. तसा आमचा मुळींच उद्देश नाहीं. परंतु हेंहि तितकेंच खरें कीं, मार्क्स-लेनिनवादी पद्धति हीच एकमेव निर्दोष पद्धति होय. आमचे संशोधक याच पद्धतीने प्राच्य विद्येचें अवगाहन करीत रहाणार आहेत. पूर्वी कधींहि ज्यांना या परिषदेंत वाव मिळाला नाहीं असे आशियांतील व आफ्रिकेंतील देश या परिषदेत आपले प्रतिनिधी मोठ्या संख्येने पाठवून ही परिषद यशस्वी करतील. ''

चीन या विषयाचा प्रसिद्ध सोविएट पंडित प्रा. एस्. एल्. टिख्विन्स्कि याने आपल्या लेखांत अशी अपेक्षा व्यक्त केली होती कीं, " या परिषदेत चीन विषयक विद्येला महत्त्वाचें स्थान प्राप्त होणार आहे. चीनमधील वा विद्येचे पंडित उपस्थित राहून लाल क्रांतीनंतर चीनमध्ये इतिहास, भाषा, साहित्य, प्राचीनसंशोधन, कायदा, व कला यासंबंधी झालेल्या विलक्षण प्रगतीचे निदर्शक असे निबंध वाचतील. ''

वर निर्देश केलेल्या गफुरॉवच्या लेखांतील अपेक्षा या परिषदेच्या अधिवेशनाने कांहीं अंशी सफल झाल्याचें किंवा निदान तसा भास झाल्याचें निदर्शनास जरी आलें तरी लालचीनमधील प्रतिनिधींच्या संपूर्ण बहिष्काराने प्रा. टिख्विन्स्किच्या अपेक्षा पूर्ण निष्फळ ठरल्या. चीनचे प्रतिनिधी किंवा चीन विद्येचे पंडित उपस्थित होते. पण ते चीनच्या बाहेरचे होते. चीनच्या बहिष्काराचें गूढ उलगडण्याचा प्रयत्न परिषदेच्या समाप्तीनंतर व परिषदेचें अधिवेशन साक्षात् चालू असतांनाहि अनेकांनी केला. लंडन येथील " फोरम् सर्व्हिस " या नियतकालिकाच्या सप्टेंबर १० (१९६०) च्या अंकांत प्रा. वाल्टर लॅकर या परिषदेस उपस्थित असलेल्या पंडिताने या बहिष्काराचा अर्थ असा सांगितला आहे कीं, " आतां लालचीन व सोव्हिएट रशिया यांचे आंतरराष्ट्रीय राजकारणांतील मतभेद केवळ धोरणापुरते मर्यादित राहिले नाहींत. मार्क्सलेनिनवादाचें खरेखुरें श्रद्धाशाली व क्रांतिकारक नेतृत्व लालचीनच करूं शकतो, सोव्हिएट रशिया नव्हे, असा दावा लालचीन सांगूं लागला आहे. आतां हे चीनरशियांमधील मतभेद ध्येयवादाच्या पातळीवरहि झगडा करूं लागले आहेत. चीनचा बहिष्कार या ध्येयवादी झगड्याचें एक उदाहरण होय. '' माझ्या मतें संयमपूर्वक विचार केल्यास इतकाच मर्यादित अर्थ या बहिष्कारावरून निघतो कीं, चीनमधील कट्टर मार्क्सवादी पंडित हे बिनमार्क्सवादी पंडितांना प्रतिगामी समजत असल्यामुळें प्राच्यदेशांच्या इतिहासाची योग्य मीमांसा करण्याची पात्रताच त्यांच्या ठिकाणीं नाहीं म्हणून बिनमार्क्सवादी पंडितांबरोबर समान आसनावर बसून चर्चा करण्याचा प्रश्नच उपस्थित होत नाहीं; अशा धारणेने चीनने बहिष्कार टाकला असावा. मार्क्सवाद्याची अशा प्रकारची मनोवृत्ति असूं शकते, असें आमच्या सारख्या एकाकाळीं मार्क्सवादी असलेल्या व्यक्तींना स्वानुभवावरून वाटतें.

इंटर नॅशनल कॉंग्रेस ऑफ् ओरिएन्टॅलिस्ट ही जागतिक विद्वानांची एक पुरातन संस्था आहे. तिचें २५ वें अधिवेशन मास्कोंत मास्को-राज्य-विद्यापीठाच्या ३२ मजली दिमाखदार महालांत भरलें. बरेचसे प्रतिनिधी या भव्य इमारतीच्या विद्यार्थी-वसतिगृहाच्या ' इषे ' विभागांत उतरले होते. कांहीं थोडी निवडक प्रतिनिधी मंडळी मात्र स्वेच्छेनें मास्को नगरींतील युक्रेन हॉटेलमध्येहि उतरली होती. मी स्वतः बादशाही थाटाच्या युक्रेन हॉटेलपेक्षां मास्को विद्यापीठाचें विद्यार्थी-वसतिगृहच पसंत केलें. कारण मास्को-विद्यापीठाच्या या नव्या इमारतींतच परिषदेचें अधिवेशन नियोजित केलें होतें. त्यामुळें जाण्यायेण्याचा वेळ वाचला व विद्यापीठाचें जवळून अवलोकन करण्याची संधि मिळाली. परिषदेच्या कार्याव्यतिरिक्त राहिलेल्या वेळांत तेथें उतरलेल्या अनेक देशांतील पंडितांशीं परिचय करून घेण्यास व गप्पागोष्टी करण्यासहि अवसर मिळाला.



अनुक्रमणिका








हें २५ वें अधिवेशन होतें हें जरी खरें असलें तरी ही परिषद २५ वर्षांपेक्षां फार जुनी आहे. या परिषदेचें पहिलें अधिवेशन सन १८७३ मध्यें पॅरिसला भरलें होतें. सुमारें ८४ वर्षांनीं हें २५ वें अधिवेशन मास्कोत भरलें. यापूर्वीचें २४ वें अधिवेशन जर्मनींत म्युनिक येथें सन १९५७ मध्यें भरलें होतें. आतांपर्यंत बहुतेक अधिवेशनें युरोपमध्येंच भरलीं. अपवादादाखल दोन अधिवेशनें स. १९०५ मध्यें आफ्रिकेंत 'आल्जिर्स' येथें आणि स. १९५१ मध्यें आशियांत 'इस्तंबूल' येथें भरलीं होतीं. हें २५ वें अधिवेशन रशियांतलें दुसरें अधिवेशन म्हणतां येतें. स. १८७६ मध्यें "सेंट-पिटर्सबर्ग (सध्यांचे लेनिनग्राड)" येथे भरलें होतें.

मास्को विद्यापीठाच्या नव्या इमारतींतील संगमरवरी चमकदार विशाल महालांत या अधिवेशनाची पहिली व अखेरची सर्व सदस्यांची बैठक भरली होती. सोविएटच्या बाहेरील देशांतील सुमारें ६०० पंडित आणि कम्युनिस्ट देशांतील १२०० पंडित मिळून २००० सदस्य अंदाजें उपस्थित होते. उद्घाटनाचें भाषण उपप्रधानमंत्री मिकोयान् यांचें रशियन भाषेंत झालें. नंतर परिषदेचे अध्यक्ष गफुरॉव आणि यूनोचे एक प्रतिनिधी यांचीं भाषणें झालीं. परिषदेंत जगांतील विविधभाषा बोलणारे सदस्य उपस्थित असल्यामुळें एकमेकांचीं भाषणें समजण्याकरितां लगेच अन्य भाषेंत अनुवाद ऐकविण्याची सोय केलेली होती. ३०—३५ भाषांचे सदस्य उपस्थित होते. परंतु इतक्या सर्व भाषांचा अनुवाद करविणें दुरापास्त असल्यामुळें रशियन, इंग्लिश, फ्रेंच व जर्मन या चार भाषांमधूनच अनुवाद ऐकविण्याची सोय या परिषदेनें केली होती. सर्वांना त्या त्या इष्ट भाषेंत अनुवाद ऐकू यावा म्हणून 'कर्णयंत्रांचा' पुरवठा केला होता. कर्णयंत्रातील बटण इष्ट बिंदूवर नेऊन ठेवलें कीं इष्ट भाषेंत अनुवाद ऐकू येई. मिकोयान् व गफुरॉव यांच्या भाषणांत प्राच्य विद्येच्या प्रश्नांपेक्षां प्राच्यदेशांतील साम्राज्यशाहीच्या विरोधी चाललेल्या मुक्तिसंग्रामांचाच अधिक ऊहापोह होता. अध्यक्षांचें उपसंहाराचें भाषणहि याच मासल्याचें झालें. त्यामुळें बिनकम्युनिस्टदेशांतील प्राच्य-विद्या पंडितांना कांहीं वेळ असा भास झाला कीं, आपण प्राच्यविद्या परिषदेंत बसलों नसून साम्राज्यशाही-विरोधी जागतिक परिषदेंत बसलों आहोंत. माझ्या शेजारीं, मागें-पुढें बसलेल्या भारतीय, युरोपीय, व अमेरिकन पंडितांच्या चेहऱ्यांकडे मी या क्षणीं दृष्टिक्षेप केला असतां असें दिसून आलें कीं, हें प्रचारकी थाटाचें भाषण ऐकून त्यांना गंमत वाटत असावी, दोन चार जणांनीं तर डोळे मिचकावून उपरोधिक स्मितहि केलें, परंतु असा राजकीय प्रचारकी प्रकार मधल्या विभागीय बैठकींत नंतर फारसा कोठेंहि घडला नाहीं, ही समाधानाची गोष्ट होय.

सोविएट देशांच्या मुख्य राजधानींत हें अधिवेशन भरविण्याचीं इतर अनेक राजकीय कारणें असतील. सहजीवनाचा प्रयोग विचारक्षेत्रांतहि आम्ही प्रामाणिकपणें करीत आहोत हें दाखविण्याचा तर उद्देश असावाच. त्याचप्रमाणे आपआपल्या हस्तिदंती महालांत रमणाऱ्या अनेक विद्वानांना आपलेंसें करावें; सहप्रवासी निवडावें; किंवा आपल्या सहप्रवाश्यांना वा कम्युनिस्ट विद्वानांना प्रसिद्ध व नामवंत विद्वानांत प्रवेश मिळवून द्यावा; इत्यादि अनेक उद्देश साधणें हाहि हेतु असावा.

विशेष लक्षांत भरण्यासारखी गोष्ट अशी दिसली कीं, सोव्हिएट देशांत क्रांतीनंतरच्या काळांत विशेषतः दुसरें महायुद्ध संपून सगळीकडे स्थिरस्थावर झाल्यावर प्राच्य-विद्या-शास्त्रांचें अध्ययन सुरू झालें आणि त्यांत मोलाची भर टाकणारीं संशोधनें होऊं लागलीं आणि त्याचबरोबर संशोधक विद्वानहि निपजूं लागले. ही गोष्ट जगांतील प्राच्य विद्यापंडितांच्या निदर्शनास आणावी असाहि एक महत्त्वाचा हेतु ही










अनुक्रमणिका

परिषद भरविण्याच्या मुळाशीं असावा. याहि पेक्षां आणखी एक खोल हेतु या परिषदेच्या संघटकांच्या मनांत होता असें परिषदेच्या पूर्वी त्यांनी प्रसिद्ध केलेल्या लेखांवरून आणि परिषदेंत निरनिराळया विभागांत वाचले गेलेल्या लेखांवरून दृष्टोत्पत्तीस आलें. तो असा कीं, आतांपर्यंत प्राच्यविद्यापरिषदेंतील संशोधन विषयक निवेदनें साधारणपणें भूतकाळांतील म्हणजे विशेषत: मध्ययुगांतील वा प्राचीन युगांतील प्राच्य संस्कृतींच्या विविध अंगांचा बारिक तपशीलवार परामर्श घेणारीं असत. परंतु या परिषदेंत विद्यमान प्राच्य राष्ट्रांच्या वर्तमानकाळांतील आर्थिक, सामाजिक, साहित्यिक, भाषिक, कलाविषयक, तंत्रविषयक, घडामोडी व परिवर्तनें यांचा ऊहापोह करणारीं निवेदनेंहि वाचण्यांत आलीं. चालू आर्थिक, राजकीय व एकंदरींत सांस्कृतिक परिवर्तनाची मीमांसा या विषयाला सोव्हिएट निमंत्रकांनी महत्त्व दिलें. परंतु त्याबरोबर या उद्देशास सुसंगत म्हणून या विषयांचे अन्यदेशीय पंडित मात्र निमंत्रित केले नव्हते. पंडित बोलाविले होते ते सर्व प्राचीन विद्येतच पारंगत होते. उदाहरणार्थ: डॉ. दांडेकर, सुनीतिकुमार चटर्जी, इत्यादि मंडळींबरोबरच दिल्ली विद्यापीठाचे डॉ. राव, धनंजयराव गाडगीळ, डॉ. चंद्रशेखर इत्यादि मंडळींनाहि प्राच्य विद्या परिषदेचें निमंत्रण जाणें तितकेंच आवश्यक व योग्य ठरलें असतें. कारण विषय तसे ठेविले होते. ही विसंगति आतांपर्यंत कोणाच्याच लक्षांत आली नाहीं म्हणून आम्ही येथे त्याचा निर्देश केला.

कोणतीहि गोष्ट मनास पटली किंवा कोणताहि विषय मनाने घेतला कीं मध्यें अर्धवट सोडावयाचा नाहीं वा अर्धवट करावयाचा नाहीं; त्याचें टोंक गांठावयाचें वा त्याला परिणामकारक, प्रभावी रूप द्यावयाचें; हें रशियन मनाचें वैशिष्ट्य आहे. असें करीत असतांना कांहीं महत्त्वाच्या अन्य गोष्टींची उपेक्षा होते किंवा कांहीं बाबतींत अन्याय होतो याची फिकीर अशावेळी रशियन मन करीत नाहीं; असें मार्मिक रीतीने अवलोकन करणाऱ्या परदेशी समीक्षकांच्या लक्षांत तेथें प्रत्यक्ष पाहिल्यावर येतें. प्राच्य विद्यांच्या प्रगतिसंबंधी हेंच सोविएट देशांत आढळून आलें. सन १९५५ पासून प्राच्य विद्यांच्या अध्ययनाला व संशोधनाला महत्त्व देण्याचें रशियनांनी ठरविलें आणि तेव्हांपासूनच या संबंधांत मोठेंच परिवर्तन घडून यावयास लागलें. याबाबतींत सध्यांचे दुय्यम प्रधानमंत्री मिकोयान यांच्याकडेहि श्रेयाचा वाटा जातो. प्राच्यविद्या-संशोधन संस्थांच्या विस्तारांना रशियांत आतां बहर आल्यासारखा दिसतो. मास्को, लेनिनग्राड, कीव, बाकू, टिफ्लिस, ताश्कंद, या ठिकाणी नव्या प्राच्यविद्याविषयक संशोधनसंस्था स्थापल्या आहेत. अलताई, तुर्की, इराणी, मंगोली व अन्य मध्य आशियांतील भाषा, साहित्य, व संस्कृति या संबंधी अध्ययनांत रशियनांनी पूर्वीपासून प्रगति केली आहे. चीन व भारत या संबंधीहि अध्ययनाचे थोडे थोडे प्रयत्न पूर्वीपासून रशियनांनी केले आहेत. परंतु आतां त्याला भर येत आहे. मध्य आशियाचें अध्ययन करणें हें तेथें त्यांचें साम्राज्यच असल्यामुळें क्रमप्राप्त आहे. आतां मध्यपूर्वेंतील असीरिअन, हिटिट, सेमेटिक, इजिप्शिअन, वगैरे प्राचीन अस्तंगत संस्कृतींचाहि अभ्यास तेथें अधिक तपशीलवार व खोल होऊं लागला आहे. प्राच्यविद्येंत जर्मन, फ्रेंच, डच, व इंग्लिश, यांची प्रगति आदर्शभूत आहे. त्यांची बरोबरी करण्याचा हेतु रशियनांनीं बाळगलेला दिसतो. चीन, जपान, कोरिया इत्यादि पूर्व व दक्षिण आशियांतील देशांच्याहि इतिहासाचें व भाषांचें अध्ययन व चिंतन यास प्राधान्य मिळूं लागलें आहे. आफ्रिका विषयक अध्ययनाला अलीकडेच महत्त्व येऊं लागलें आहे. त्याकरितां अध्ययन करणाऱ्या संस्था त्यांनी काढल्या आहेत. त्याबरोबरच आपले विद्यार्थी व विद्वान अधिक संशोधनार्थ ते बाहेर देशीं पाठवूं








लागले आहेत. आधुनिक, प्रगत, पाश्चात्य भाषांचा विशेषतः इंग्लिश, फ्रेंच व जर्मन या भाषांचा अभ्यास, प्रगतींत आपण मागें राहूं नये म्हणून, रशियन लोक अधिक कसोशिने करीत आहेत व त्या भाषांतील अपार ग्रंथसंपत्ति अविश्रांत परिश्रम करून रशियन भाषेत अनुवादकरून आणीत आहेत. हें जसें स्पष्ट दिसतें तसेंच हिंदी, बंगाली, उर्दू अरेबिक व पर्शिअन भाषांच्याहि अध्ययनाला ते महत्त्व देऊं लागले आहेत. आतां त्यांचे शेकडो विद्यार्थी भारत, चीन, आफ्रिका आणि मध्यपूर्व देशांत अध्ययनार्थ येऊं लागले आहेत. हें करण्यांत त्यांचा उद्देश केवळ भाषाशास्त्री व प्राचीन विद्या विशारद तयार करणे एवढाच नाहीं. त्यांना जगांतील सर्व राष्ट्रांत आपली तज्ज्ञ माणसें पाठवून त्यांच्याशीं घनिष्ठ संबंध स्थापित करावयाचा आहे.

प्राच्य विद्या परिषेदच्या प्रसंगाने वर निर्दिष्ट केलेल्या प्रमाणें त्यांच्या प्रयत्नांचें फळ दिसून आलें. उर्दू, हिंदी वगैरे भाषा सफाईने बोलणारे नव्या उमेदीचे रशियन पंडित अन्य देशीय पंडितांत मिळूनमिसळून संबंधित विषयांच्या बाबतींत चर्चा करीत असलेले पाहून गंमत वाटली. या मंडळींमध्यें बोल्शेव्हिक क्रांतिकारक फारच थोडे असतील. निदान कांहीं बोटावर मोजण्यासारखी मंडळी सोडल्यास बाकीचेतरी राजकारणाशीं अलिप्त असल्यासारखे वाटले. निदान वरवर तरी तसें दिसलें. वरवर म्हणण्याचें कारण एवढेंच कीं, सोव्हिएट देशांतील प्रत्येक विद्यार्थ्याला मॅट्रिक, बी. ए., किंवा त्यापुढील परीक्षेंत मार्क्सवाद, लेनिनवाद व कम्युनिस्ट पक्षाचा इतिहास या विषयांचें सक्तीने अध्ययन करावें लागतें. "पुनः पुनः तेंच तें एरंडाचें गुऱ्हाळ कशाला!" अशी तक्रार मनांतल्या मनांत उच्च विद्यांचा विद्यार्थी करीत असतो तरी त्याला हा विषय टाळतां येत नाहीं.

या परिषदेंत एकंदर इजिप्त, असीरिया, अरबी, भारत, चीन, जपान, आफ्रिका, सेमेटिक, अरबदेश, इराण, मध्यआशिया, तुर्क, मोंगोल, कॉकेशस, हिटिट, अल्ताई, अफगाण, दक्षिणपूर्व आग्नेयआशिया, कोरिया, आणि मंगोलिया यांच्या संबंधी विद्यांचे २० विभाग होते आणि या प्रत्येक भागाची अलग बैठक रोज सकाळ-संध्याकाळ चार पांच दिवस होत होती. त्यांतील प्रत्येक विभागांत सोव्हिएट देशांतील विद्वानांचें किंवा अभ्यासूंचें अध्ययन–निष्कर्षावरील लेख इतर पंडितांच्या बरोबरच सादर केले गेले. रशियनांनी मुख्यतः रशियन भाषेमध्ये लेख लिहिले होते तरी जर्मन, फ्रेंच व इंग्लिशमध्येहि त्यांनी सादर केलेले लेख फारसे कमी नव्हते. प्राचीन, मध्ययुगीन, व वर्तमान अशा त्रैकालिक विषयांवर त्यांचे लेख होते. कांहीं लेखांचा दर्जा खरोखर चांगला होता. वर्तमान काळाशीं किंवा नजिकच्या भूतकाळाशीं संबंधित असलेल्या विषयांवरील त्यांचें प्रतिपादन मात्र मार्क्स-लेनिनवादाच्या बंधनांत जखडून लिहिलें गेल्यामुळें एकांगी किंवा कांहीं मुद्यांच्या संबंधांत उथळ असें दिसून आलें. प्रत्येक विभागांतील लेखांचें व चर्चेचें महत्त्वमापन हें प्रस्तुत लेखकाच्या कुवतीबाहेरचें आहे; किंवा विशेषतः भारतविद्याविभागाच्या शिवाय अन्य विभागांत जाण्यास अवसर न राहिल्यामुळें त्या अन्य विभागांतील लेख व चर्चा या संबंधी विशेष सांगता येणेंहि शक्य नाहीं. दिग्दर्शनार्थ, भारतविद्याविभागाच्या बैठकींत काय घडलें याचें थोडक्यांत निवेदन करून हा परामर्श आटोपतां घेतो.

भारतविद्याविभागाचे दोन उपविभाग होते. (१) इतिहास व तत्त्वज्ञान आणि (२) भाषाशास्त्र व कला. प्रथम या दोन्ही उपविभागांची तारीख ९–८–६० ला दुपारी ३ वाजतां संयुक्त बैठक झाली. बैठकींत सुनीतिकुमार चटर्जी यांचें








लांबलचक भाषण झालें. त्यांनी कालमर्यादेपेक्षां दुप्पट वेळ घेतला. त्यांचें भाषण चांगलें, मनोरंजक होतें. अशा पंडित सभेस सर्वसाधारण उपयुक्त माहिती देणारें भाषण आवश्यक नसतें. विशेष नवा संशोधित मुद्दा सांगण्याकरितांच भाषण करणें योग्य दिसतें. सुनीतिकुमारांचा "चीन व भारतीय यांची सांस्कृतिक देवघेव" हा विषय होता. बाकीचे मामुली मुद्दे सोडल्यास त्यांचा एक मुद्दा खूप मार्मिक वाटला. भारतांतील वाममार्ग हा धार्मिक संप्रदाय "चीनाचार" म्हणून उल्लेखिला जातो. वाममार्ग हा चीन देशांतून भारतांत आला, ही गोष्ट त्यांनी उलगडून दाखविली. एका जर्मन पंडितांचें त्यानन्तर भाषण झालें. त्याने असा मुद्दा मांडला कीं, ट, ठ, ड, ढ, ण हा जो 'ट' वर्ग या वर्गांतील अक्षरानें सुरुवात होणारे संस्कृत शब्द संस्कृत भाषेंत द्रविड भाषेंतून आले असा जो समज आहे तो खरा नाहीं. द्रविड भाषेंतहि हे ट वर्गापासून प्रारंभ होणारे शब्द अत्यल्प आहेत. असे शब्द द्रविडपूर्व भाषेतील असावेत. त्या नन्तर डॉ. घोष यांनी भारतांतील अतिप्राचीन मोहोंजोदारोसंस्कृति आणि तत्कालीन अन्य भारतीय संस्कृति याच्या संबंधावर चर्चा करणारा निबंध वाचला. पांच दिवसांच्या बैठकींत भारतविद्या विभागांत तत्त्वज्ञान, भाषाशास्त्र, अर्थशास्त्र, धर्म, राजकारण, साहित्य, संस्कृत, पाली, तामिळ, तेलगु, इत्यादि भाषा अशा विषयांवरील लेखवाचन व चर्चा झाल्या. मी स्वतः माझा लेख संस्कृतमध्यें लिहून आणला होता परंतु परिषदेच्या अधिकृत भाषा चारच होत्या त्यामुळें माझ्या लेखाचा सारांश मी इंग्लिशमध्यें सांगितला. त्यावर रशियन संस्कृत पंडित कल्यानोव व डॉ. रामभाऊ दांडेकर यांनी आक्षेपात्मक प्रश्न विचारून चर्चेत भाग घेतला. माझ्या लेखाचा विषय "संस्कार व यज्ञ यांची एकता" असा होता. मी त्यांत असें सिद्ध केलें कीं, यज्ञसंस्थेला वेदकालीं विस्तृत रूप येण्याच्या अगोदर तिचें मूळ स्वरूप अत्यंत साधें असें होतें. 'पाकयज्ञ' नामक यज्ञ हाच वेदपूर्व आर्यांचा अविकसित स्वरूपाचा मूळ यज्ञधर्म होय. सुप्रसिद्ध सोळा संस्कार हे पाकयज्ञच होत, असें बौधायन वगैरे प्राचीन धर्मशास्त्रकारांचें मत आहे. सर्व यज्ञांना संस्कार अशी संज्ञा गौतम या धर्मसूत्रकाराने दिली आहे. संस्कारांचा मूळ उद्देश जन्मजात पातकाचें (original sin चें) परिमार्जन होय. ख्रिश्चन धर्मांतील जन्मजात पातक कल्पनेचें मूळ ख्रिस्तपूर्व वैदिक धर्मांत संस्कारविषयक तत्त्वज्ञानांत प्रथम आढळतें. आदिमनूने प्रथम जो धर्म आचरला व प्रजा निर्मिली तो धर्म पाकयज्ञ होय, असें शतपथ ब्राह्मणांतील जलप्रलयाच्या कथेंत सांगितलें आहे. ही जलप्रलयाची कथा जगांतील अनेक प्राचीन धर्मांच्या पुराणकथांपैकीं एक महत्त्वाची कथा आहे.

रशियन पंडितांनी इंग्लिशमध्यें निवेदन केलेल्या संशोधनांत लक्षांत ठेवण्यासारखीं चारपांच निवेदनें होतीं. त्यांतल्या त्यांत अधिक महत्त्वाचीं अशीं दोन निवेदनें ठरतात. ओरान्स्की याचें मध्यएशियामध्यें आढळलेल्या एका भारतीय बोलीबद्दलचें आणि दुसरें ऋग्वेदांतील क्रियापदांबद्दलचें एलीझाबेन्कोवा या विदुषीचें निवेदन होय. या परिषदेचे मुख्य चिटणीस ड्याकोव् यांनी "भारताच्या स्वातंत्र्य आंदोलनाचा विकास" यावरील निवेदन वाचलें. तें बरेंच विवादग्रस्त व फारच अपुरें वाटलें. त्यांनी असें प्रतिपादन केलें कीं, "भारताच्या स्वातंत्र्य आंदोलनावर राष्ट्रीय भांडवलदार वर्गाचा बराच प्रभाव होता. हा प्रभाव अखेरपर्यंत टिकला. मध्ययुगीन सरंजामी








अवशेष जीं संस्थानिक राज्यें तीं लयास नेलीं. परंतु कामगारवर्ग वा जनता यांचें प्रभावी नेतृत्व न राहिल्यामुळें या आंदोलनाला जनता क्रांतीचें परिपूर्ण फळ प्राप्त झालें नाहीं." या निवेदनानंतर मी स्वतः उठून कांहीं आक्षेप घेतले. माझा पहिला आक्षेप असा होता कीं, या भारतीय स्वातंत्र्य आंदोलनांत भारतीय समाजांतील सर्व वर्गांतील लोक कमीजास्त प्रमाणांत सामील झाले होते. कारण सर्व जनतेला पटेल असेंच स्वातंत्र्य हें ध्येय होतें. त्यामुळें राष्ट्रीय भांडवलदारहि त्यांत सामील होता. परंतु या चळवळीचें नेतृत्व राष्ट्रीय भांडवलदारवर्गाला प्राप्त झालें नाहीं. दुसरा आक्षेप असा कीं, "राष्ट्रीय भांडवलदार वर्ग" ( National Bourgeoisie ) हा मार्क्सवादी प्रयोग अतिव्याप्त, अस्पष्ट व संदिग्ध अर्थाचा आहे. मागासलेल्या देशांतील अर्थव्यवस्थेंत व समाज संस्थेंत अत्यल्प संपत्तीचे मालक ( Bourgeois ) फार असतात. व ते आर्थिकदृष्ट्या अत्यंत दुर्बळ असतात. म्हणून त्यांना लोकशाही समाजवादाचें आकर्षण खूप असतें. ते क्रांतीचे मदतगारच असतात. तिसरा आक्षेप असा कीं, या निवेदनांत बुद्धिजीवी वर्गाच्या नेतृत्वाची दखल घेतली गेली नाहीं. मी स्वतः तीस वर्षें या स्वातंत्र्य संग्रामांत निरंतर संपूर्णपणें भाग घेतला आहे. माझा अनुभव असा आहे कीं, या चळवळीचें नेतृत्व बुद्धिजीवी वर्गानेंच केलें आहे व या बुद्धिजीवी वर्गाच्या पाठीशीं भारतांतील ८० टक्के ग्रामीण जनता व शेतकरी वर्ग उभा राहिला होता. हें जनतेचें अस्सल आंदोलन आहे व हेंच भारतीय स्वातंत्र्य आंदोलनाचें खरेंखुरें स्वरूप होय. म्हणून हें आंदोलन लोकशाही मार्गानें व व्यक्तिस्वातंत्र्याच्या अनुरोधानें समाजवादी क्रांतींतच अनिवार्यपणें पर्यवसित होणार आहे. कम्युनिस्ट मार्क्सवाद्यांनीं या आंदोलनाचा नीट व सावधपणें अभ्यास केला तरच त्याच्यांतील प्रगतिशीलता समजू शकेल. या माझ्या म्हणण्यांतील शेतकरी वर्गाबद्दलचा मुद्दा मान्य करून डयाकोव यांनीं बाकीच्या मुद्यांना बगल दिली. इतर रशियन निवेदनें छापून वाटलीं गेलीं होतीं; त्याला अपवाद ड्याकोव यांचेंच निवेदन होय. मी नंतर त्यांच्यापाशीं त्यांच्या लेखाची प्रत मागितली परंतु तो लेख वेळेवर छापतां आला नाहीं म्हणून प्रत द्यावयास शिल्लक नाहीं असें मला त्यांनी सांगितलें. असेंच विवादग्रस्त दुसरें निवेदन जी. जी. कोटोव्स्की यांचें होतें. त्यांनी आपल्या निवेदनांत "१९ व्या शतकांत मोडकळीस आलेल्या भारतीय ग्रामीण जमाती" या विषयाची मीमांसा केली आहे. हें निवेदन छापून वाटण्यांत आलें होतें. जमीन मालकीची मिरासदारी पद्धति १९ व्या शतकांत ग्रामीण जमातीच्या अवनतीस कारण झाली, असें या निवेदनाचें तात्पर्य होतें. त्यांत त्यांनी सावकारी व ब्रिटिशांचा सुधारलेल्या पद्धतीचा व्यापार या दोन गोष्टी भारतीय ग्रामीण समाजाच्या अवनतीस कारण झाल्या याची दखल घेतली नाहीं, असा मी त्यावर आक्षेप घेतला. हा आक्षेप त्यांनी मान्य केला. मला अशा प्रकारच्या निवेदनांमध्यें असा दोष आढळून आला कीं, इतक्या व्यापक स्वरूपांचे विषय छोटेखानी लेखांचे विषय केल्यामुळें त्यांत एकांगीपणा व काटकुळेपणा रहातो. म्हणून अशा प्रसंगीं थोड्या, मोजक्या शब्दांत सांगण्यासारखेच विषय घेणें बरें.

परिषदेची समाप्तीची बैठक होण्याच्या अगोदर कांहीं निवडक तत्तद्देशीय नेत्यांची बैठक सामान्य स्वरूपाचे ठराव करण्याकरितां अखेरच्या दिवशीं भरली होती. त्यांत पुढील अधिवेशन कोणत्या देशांत भरावें याबद्दल प्रथम ऐक्यमत्य होईना.



अनुक्रमणिका

अमेरिकन प्रतिनिधींची मागणी होती कीं पुढील अधिवेशन न्युयॉर्कला भरावें. रशियन प्रतिनिधींचा आग्रह होता कीं, तें कैरो येथें भरावें. वाद टाळण्याकरितां अखेरीस सर्वानुमतें भारत मान्य झाला. चीनचेंहि आमंत्रण होतें, असें या अधिवेशनापूर्वी लोक म्हणत होते. चीनने बहिष्कार टाकल्यामुळें पुढील अधिवेशन भारतांत येणार आहे.

हें अधिवेशन भरण्याच्या अगोदर जी पूर्व तयारी लागते ती भारतांत अत्यंत अपुरी आहे. पूर्वतयारी म्हणजे प्राच्यविद्यांच्या विविध शाखांचें सविस्तर अध्ययन केलेले व अधिकाराने बोलणारे किंवा, लिहिणारे पंडित व तशा संस्था भारतांत आहेत काय ? यांचें 'आहेत !' असें विधायक उत्तर देतां आलें पाहिजे. भारतांत भारतविद्येचे निष्णात पंडित आहेत; परंतु इजिप्त असीरिया, अरब राष्ट्रें, आग्नेय राष्ट्रें व अतिपूर्वेकडील देश यांचें अध्ययन करणारे नामवंत पंडित किंवा तशा संस्था भारतात कोठें आहेत ? रशियांतल्या या गेल्या अधिवेशनांत प्रत्येक विभागांत अधिकारयुक्त वाणीने प्रतिपादन करण्यास समर्थ असे अनेक पंडित व विभागाध्यक्षपद विभूषित करणारे विद्वान रशियाने पुरविले. भारतास हें सामर्थ्य आहे काय ? त्याकरितां पुढील अधिवेशन चारपांच वर्षे लांबलें तरी चालेल परंतु आपलें विद्याविषयक दारिद्र्य दिसतां कामा नये. यासंबंधीं फार काळजी घ्यावयास पाहिजे.










## वाचकांचा पत्रव्यवहार—

रा. रा. संपादक, नवभारत यांस,

सप्टेंबरच्या 'नवभारतांत' प्रा. शहा व श्री. वऱ्हाडपांडे यांनी आपल्या पत्रांच्या द्वारें कांही गैरसमज निर्माण करण्याचा बुद्धिपुरस्सर प्रयत्न केला आहे असें मला वाटत असल्यामुळें माझी बाजू सूत्ररूपांत मी खाली मांडीत आहे. आपण तिला प्रसिद्धी द्यावी अशी विनंति आहे.

( १ ) श्री. शहांनी माझीं कांही विधानें हीन पातळीचीं आहेत ( उदा० 'श्री. वऱ्हाडपांडे यांनी श्री. हर्षादिकांचे ग्रंथ वाचलेच नाहींत' इत्यादि ) असें म्हटलें आहे. व तसेंच तीं 'एका विशिष्ट भारतीय परंपरेला धरून आहेत' असेंहि विधान केलें आहे. यावरून काय असा अर्थ घ्यावा की श्री. शहांच्या मतें 'ही विशिष्ट भारतीय परंपरा हीन दर्जाची आहे ?' शहांनी माझ्यावरून एकदम भारतीय परंपरेवर घसरणें त्यांच्या उच्च पातळीला धरून आहे किंवा नाहीं हें समजत नाहीं. तसेंच एक प्राचीन व विद्वन्मान्य ग्रंथकारावर त्यानें एखाद्या प्रश्नाचा सांगोपांग विचार केला असतांनाहि, व त्यांच्या ग्रंथाच्या पानापानावर त्या विचारांची छाप पडली असतांनाहि त्यानें तो विचार केलाच नाहीं असें सुचवणें व त्या ग्रंथकाराची 'पलायनवादी' 'गूढगुंजनवादी' अशा विशेषणांनी हेटाळणी करणें हें शहांना उच्च वैचारिक पातळीचें निदर्शक वाटतें काय ? तसें जर नसेल तर कोणी असल्या आरोपांचा साधार प्रतिवाद करून वरील सारखीं ( माझीं ) विधानें मांडलीं तर वादविवादाची पातळी सोडल्यासारखें होतें काय ? चर्चेत संयम ठेवला पाहिजे खरा पण एका बाजूवरच संयमाची सक्ति काय म्हणून ? Mind सारख्या त्रैमासिकांत प्रा. एमेटने जॉर्ज कॅण्टरचे लेख न वाचतांच कांहीं विचार मांडले असल्यामुळें रसेलनें त्याला सरळ ( Foolish ) मूर्ख म्हटलें आहे. श्री. शहांना मला नम्रपणें असें सांगावयाचें आहे कीं त्यांना आधुनिक गणितज्ञ व तत्वज्ञाबद्दल जितका आदर वाटतो तितकाच माझ्यासारख्या पामरांना श्रीहर्ष, चित्सुख, मधुसूदन सरस्वती इ. भारतीय ग्रंथकारांविषयीं वाटतो. ( दुर्दैवानें किंवा सुदैवाने म्हणा ) माझ्यावर उच्च गणित, पाश्चात्य तत्त्वज्ञान व तसेंच भारतीय तत्त्वज्ञान या सगळ्यांचा सारखाच संस्कार झालेला असल्यामुळें 'श्री. वऱ्हाडपांड्यां प्रमाणें भारतीय व पाश्चात्य अनिर्वाच्यवादी हे एकजात 'पलायनवादी' आहेत असें ठोकून देण्याचें मला धाडस होत नाहीं.

( २ ) अनिर्वाच्यवादाची भूमिका ( वास्तविक ही एक भूमिका नाहीं— इतर सर्व भूमिका विसंगत आहेत येवढेंच अनिर्वाच्य वाद्यांचें म्हणणें आहे ) शहांनी उपस्थित केलेल्या सर्वच भूमिकेशी थोडी फार जुळते व तिचेंच मी प्रतिपादन केलें आहे. Intuitionism Axiomaticism ( Tractatus मध्यें दिलेल्या अनेक पुस्तीसह ) अनिर्वाच्यवादाला बरेंच जवळचें आहे. या वादाचें खरें स्वरूप खण्डनखण्डखाद्य, अद्वैत सिद्धीवरील लघुचंद्रिका वगैरे प्राचीन संस्कृत ग्रंथांत व थोड्याफार प्रमाणांत Appearance and Reality सारख्या आधुनिक ग्रंथांतहि आढळतें.

( ३ ) श्री. शहांच्या मतें गणिती कांटेकोरपणा स्वीकारल्यामुळेंच तत्त्वज्ञानाचा अर्वाचीन काळांत खरा विकास होऊं शकला आहे. कोणते जुने प्रश्न तत्त्वज्ञानानें निरुपयोगी म्हणून मागें टाकले व कोणते नवे प्रश्न महत्त्वाचे म्हणून चर्चेस घेतले हें शहांनी स्पष्ट कराकरावयास हवें होतें. कदाचित् Linguistic Analysis, Logical Positivism, Scientism, Physicalism या अनेक नांवांनी ओळखल्या जाणाऱ्या विचारसरणीकडे व तिचे अर्वाचीन समर्थक हॅम्पशायर, स्टिवेन्सन्, क्विन्, बर्जमान् इ. विचारकांकडे शहांचा इशारा असेल. त्यावर मला एवढेंच म्हणावयाचें आहे कीं ह्या सर्व विचारसरणींचा आतां भर ओसरला आहे. यांच्या प्रतिस्पर्धी विचारसरण्या इरोल् हॅरिस्, पी. ग्लॅसेन्, स्ट्रॉसन् वगैरे विचारकांनी साक्षेपानें Mind व इतर त्रैमासिकांत मांडल्या आहेत. एवढ्यानें शहांचें समाधान होत नसेल तर त्यांनी अर्वाचीन गणितोधारित तत्त्वज्ञानाच्या कांटेकोरपणाचीं निदर्शक उदाहरणें पुढें आणावींत. मग मी त्यांना त्यांतील तात्त्विक उणीवा दाखविण्याचा प्रयत्न करीन.

( ४ ) श्री. शहा यांनी Principles of Mathematics नंतर कोणतीं पुस्तकें वा लेखक ( रसेल विरुद्ध विचार मांडणारे, किंवा रसेलशी असहमत असलेलें )





अनुक्रमणिका





पुढें आले याची पृच्छा केली आहे. यासाठीं शेटवीं टीपेंत कांहीं लेखांचा मी निर्देश केला आहे.

(५) श्री. वऱ्हाडपांडे आपल्या पत्रांत फक्त त्यांच्या लेखांशी 'संबद्ध' अशा माझ्या मुद्यांबद्दलच लिहितात. ज्यांनीं माझा लेख वाचला असेल त्यांना हें सांगण्याची गरज नाहीं कीं वऱ्हाडपांडे यांच्या लेखांत नसलेल्या कोणत्याहि मुद्याबद्दल मी कांहींहि लिहिलेलें नाहीं. म्हणून तो लेख काळजीपूर्वक वाचलेला नाहीं असा वऱ्हाडपांडे यांचा आरोपहि त्यास धरून नाहीं. या आरोपाची शक्यता गृहीत धरूनच मी वऱ्हाडपांडे यांच्या लेखांतील उद्धरणें घेऊन त्यांतल्या चुका दाखविल्या आहेत. लेखांत व्यक्त न झालेलें असें वऱ्हाडपांडे यांचे कांहीं विचार असूं शकतात तें समजण्या इतपत clairvoyance माझ्यांत नाहीं.

(६) 'काळाची उत्पत्ति कोणत्या काळीं झाली' असा प्रश्न श्री. वऱ्हाडपांडे यांच्या उपपत्तीतूनच निघतो. तो माझा स्वतःचा नाहीं.

(७) गतीच्या शक्यतेची जी उपपत्ति श्री. वऱ्हाडपांडे यांच्या लेखांत मांडलेली आहे ती त्यांच्या तत्संबंधी वाक्यांच्या उद्धरणपूर्वक मी खोडून काढली आहे. मराठी भाषेतील शब्दांचा रूढ अर्थानेंच वऱ्हाडपांडे यांनीं वापर केला आहे असें गृहीत धरूनच मी हें धाष्टर्य केलें आहे. नव कवींच्या शब्दांना असतात त्याप्रमाणें वऱ्हाडपांडे यांच्या वाक्यांना अर्थाच्या अनेक कडा असल्यास मला माहित नाहीं.

(८) 'काळ स्थिर आहे' हें माझें विधान कांटेकोर आहे. असें मी कोठेंहि म्हटलेलें नाहीं. पण या विधानाचें स्पष्टीकरण देणें कठिण नाहीं. पण सध्या या स्पष्टीकरणाच्या भरीस न पडतां वऱ्हाडपांडे यांच्या 'काळ स्थिर' तर 'अस्थिर कोण' या प्रश्नाचें माझें उत्तर साधें आहे. 'वस्तु'

(९) 'बेरजे'चा रूढ अर्थच मीं मांडला आहे. कारण मला गणितज्ञांच्या कल्पनेची पारिभाषिकताच दाखवून द्यावयाची आहे. पण वऱ्हाडपांडे यांची परिभाषा मान्य केल्यानेंहि 'अनंत' ही संख्या बेरजेनें न वाढणारी इत्यादि गोष्टी सिद्ध होत नाहींत. कारण 'अनन्तरूप समूहांत एक पासून अनंतापर्यंत सर्व घटक आहेत' असें जर दाखवतां आलें तर 'अनन्ता'च्या अनन्ततेताला बाध येतो. ही आपत्ती टाळण्यासाठी अनन्ताची एक वेगळीच परिभाषा ठरवावी लागेल. तसें केल्यास अनन्तासंबंधींची सर्व चर्चा अनन्ताच्या परिभाषेंतून कोणते निष्कर्ष निघतात येवढ्या पुरतीच मर्यादित करावी लागेल. तिचा गतीचे प्रश्न सोडविण्यास कांहीं उपयोग होऊं शकत नाहीं.

(१०) 'अनन्त अंकांची बेरीज शक्य नाहीं' अशा प्रकारच्या (१) माझ्या विधानाचा विपर्यास करून वऱ्हाडपांडे सुचवितात कीं मला प्राथमिक बीजगणिताचें ज्ञान नाहीं. वरील स्पष्टीकरणावरून असें दिसून येईल की 'बेरजे'च्या पारिभाषिक अर्थावर माझा आक्षेप नाहीं बेरजेचा रूढ अर्थ—जो मीं दिला आहे व ज्याचाच उपयोग गतीचे प्रश्न सोडवण्यास होऊं शकतो—तो अनन्ताच्या कल्पनेशी विसंगत आहे येवढेंच माझें म्हणणें आहे. बेरजेची साधी कल्पना श्रेढींना लागू पडत नसल्यामुळेंच 'Limit' ची कल्पना गणितज्ञांना मांडावी लागली. गणितासंबंधींच्या माझ्या ज्ञानाबद्दल जें परोक्षपणें वऱ्हाडपांडे यांनीं सुचवलें आहे. त्यावर इतकेंच सांगितलें तर पुरें होईल की तत्त्वज्ञानाच्या अध्यापनापूर्वी कांहीं काळ मी उच्च गणिताचेंहि अध्यापन केलेलें आहे व गणितज्ञांच्या बैठकींत गणितावर कांहीं प्रबंधहि वाचले आहेत.

(११) 'संख्यांची संख्या व संख्यांची बेरीज' यांत जो घोटाळा वऱ्हाडपांडे यांनीं दाखविला आहे तो शाब्दिक स्वरूपाचा आहे. संदर्भावरून 'संख्यांची संख्या' हाच अर्थ मला अभिप्रेत आहे हें समंजस वाचक समजूं शकतो.

(१२) पूर्वी संख्या निश्चित करणें म्हणजे मोजणें असें समजत. पण आजकाल $\sqrt{-१}$, $\sqrt{२}$, ०, वगैरे अंकांचें Arbitrary पारिभाषिक अर्थ ठरवून त्यासंबंधीं विचार केला जातो. हा विचार वर सांगितल्याप्रमाणें गृहीतकृत्यांच्या निष्कर्षणाच्या स्वरूपाचाच (अमुक कल्पना स्वीकारल्यास तिच्यांतून कोणकोणते निष्कर्ष काढणें शक्य आहे असा) असूं शकतो.

(१३) सुसंगति, विसंगतीचा प्रश्न कोणत्याहि एका वस्तूच्या बाबतींत उद्भवत नाहीं. अनिर्वाच्यवाद्यांचें असें म्हणणें आहे कीं जगतासंबंधीच्या ज्या










अनेक कल्पना आपण उराशीं बाळगतो त्या आपसांत विसंगत आहेत ह्या विसंगतीलाहि 'पाया' म्हणावयास हरकत नाहीं.

(१४) श्रीहर्षानें सर्व संभाव्य निरुक्तींचा विचार केला आहे व त्याबरोबरच इतर कोणतीहि निरुक्ति शक्य नाहीं असेंहि ठिकठिकाणीं प्रतिपादन केलें आहे. विस्तृत चर्चा अद्वैतसिद्धीवरील लघुचंद्रिकेंत व Central philosophy of Buddhism या पुस्तकांत पहावी. अनिर्वाच्यवाद्यांचें हें स्पष्टच मत आहे कीं कोणतीहि निरुक्ति शक्य नाहीं. हा विषय प्रस्तुत नसल्यामुळें त्याचा मी विस्तार केलेला नाहीं.

(१५) 'समविषम मिळून जितके अंक होतात तितकेच केवळ सम अंक होतात' या विधानावरील माझ्या आक्षेपाबद्दल श्री. शहा म्हणतात कीं, गणिताचें प्रत्येक विधान आपण स्वीकारलेल्या गृहीत कृत्यांवर अवलंबून असते' अगदी बरोबर आहे. पण ही गृहीत कृत्यें कोणतीं, अनंत म्हणजे काय, बेरीज; वगैरे शब्दांचा अनंताला लागू पडणारा अर्थ कोणता या सर्व मुद्यांचें स्पष्टीकरण देण्याऐवजीं व० नी सरळ वरील विधान ठोकून दिलें आहे. हें स्पष्टीकरण किती कठिण आहे हें विट्गेन् स्टाईनच्या Remarks on the Foundations of Mathematics या प्रबंधांतील उलट सुलट विधानें व त्यांवरील एम्ब्रोस वगैरेंच्या त्यांवरील टीकेवरून दिसून येईल.

शेवटीं माझें नम्र असें निवेदन आहे कीं, या व इतर विषयासंबंधी अगदीं वरच्या पातळीवरून चर्चा करण्याची माझी केव्हांहि सिद्धता आहे पण प्रतिवाद्यांनीहि तसली तयारी दाखविली पाहिजे. *

— नारायणशास्त्री द्रविड

---

## पुस्तक-परामर्श —

**आद्य कवि श्रीमुकुंदराजकृत श्री विवेकसिंधु व श्रीपरमामृत** (संपादक : श्रीयुत रामचंद्र विठ्ठल बोबडे. मूल्य ५ रुपये, प्रकाशक — श्रीविवेकसिंधु प्रकाशन समिति, नागपूर).

श्रीयुत रा. वि. बोबडे हे विदर्भांतील संतवाङ्मयाचे गाढे अभ्यासक आणि संशोधक आहेत. त्यांच्या वयाकडे पाहून तरुणांसहि लाजविणाऱ्या त्यांच्या अखंड परिश्रमाचें कौतुक वाटतें. अलिकडे ७८ वर्षांत धुळ्याचे श्रीयुत गोगटे व त्यानंतर प्रा. कुलकर्णी यांच्या संशोधित आवृत्त्या निघाल्या. त्यानंतर या वर्षी महाविदर्भांतील संतवाङ्मयाचे संग्राहक आणि संशोधक श्रीयुत बोबडे यांनीं विवेकसिंधु आणि परमामृत यांची सुबोध सुटसुटीत प्रत प्रसिद्ध केली. याहि प्रतीचें वैशिष्ट्य लक्षणीय आहे.

विवेकसिंधूच्या जुन्या हस्तलिखितांचा शोध करण्याकरतां श्री. बोबडे १९५८ मध्यें बैतूल जिल्ह्यांतील मूलतापी येथें गेले असतां त्यांना एक वृद्ध साधु भेटला. त्यानें जुना विवेकसिंधु दिला व श्री. बोबडे यांनीं तो लिहून घेतला. त्यांतील प्रकरण अकराचीं दोन पानें मोठ्या कष्टानें त्या साधूनें दिलीं. मूळ पोथी परत घेतली. अशी हकीकत संपादकांनीं आपल्या निवेदनांत सांगितली आहे. ही मूळ पोथी किती जुनी हें सांगणें कठिण आहे कारण ती आतां उपलब्ध नाहीं, तथापि ती फार जुनी होती असें त्यांचें मत आहे. या विषयीं एक महत्त्वाची गोष्ट अशी कीं या विवेकसिंधूच्या जुन्या पोथींतील समासिलेख अन्यत्र उपलब्ध झालेला नाहीं. त्यामुळें प्रस्तुत नूतन संपादनाची आवश्यकता आणि अन्वर्थकता सहजी सिद्ध व्हावी. या दृष्टीनें प्रस्तुत ग्रंथांतील शेवटच्या ओव्या १३७ ते १४१ या विचारार्ह आहेत. त्या अशा: —

या ग्रंथाचें उत्तरार्ध। जे निर्गुण निरुपम प्रसिद्ध।
म्हणती राजयोगी सिद्ध। मुकुंदराज ॥ १३६ ॥
प्रकरण ११

लिहिणार सुरेंद्रभारती। संमत १२४४ प्रती।
विजयादशमी मुहूर्ती। सूर्य माध्यानीं येतां ॥ १३७ ॥

---

* P. of M. यानंतर पुढें आलेल्या कांहीं विचारसरणींचा श्री. शहांनी उल्लेख केलाच आहे, त्याशिवाय गतीसंबंधीं कांहीं लेख १९५० नंतरच्या Aristo Society च्या Proceedings मध्यें तसेंच Mind व philo Qurly च्या अंकांत पहावेत.







वैनगंगेचें तीर । अंबनगरी असे थोर !
श्रीगुरुसमोर । ग्रंथ समाप्त जाहला ।। १३८ ।।
आतां शक महाराष्ट्राचा । शालिवान राजा पैठणीचा ।
नामोच्चार तयाचा । जाणती सर्व लोक ।। १३९ ।।
शके १११० होत्तर । साधारणनाम संवत्सर ।
राजा शारंगधर । राज्यकरी ।। १४० ।।
ऐसा समय सर्वोत्तम । तेथें मुकुंदद्विजोत्तम ।
विवेकसिंधु मनोरम । निर्मिता झाला ।। १४१ ।।
या ग्रंथाचा उतार । शके ११२२ सोत्तर ।
दुंदुभीनाम संवत्सर । ते दिवशीं जाहला ।। १४२ ।।
हस्ताक्षर जयाचे । कृष्णभट्ट नाम तयाचें ।
रामभट्ट नाम पितयाचे । उपनाम पंडित ।। १४३ ।।
वस्ती तापीतीर । ग्राम नामें वन्नर ।
हा ग्रंथ सविस्तर । उतार करणे जाहला ।। १४४ ।।

... गुरुप्रशंसा निरुपणनाम उत्तरार्धे एकादश प्रकरण समाप्त ।।

विवेकसिंधूचीं पूर्वार्ध आणि उत्तरार्ध मिळून प्रकरणें ७ + ११ = १८ त्यांपैकीं शेवटच्या चार प्रकरणांविषयीं संशोधकांनी थोडीबहुत शंका प्रदर्शित केली आहे. त्याचप्रमाणें सच्चिदानंद पदत्रय हें० ( १७ – अ ) प्रकरण ' कल्पित जाणोनि वाळावे । विरुद्धार्थ म्हणोनि' असें कांहीं प्रतीमध्यें म्हटलें आहे. १८ वे, गुरु माहात्म्याचें प्रकरण, उत्तरकालीन असावें असेंहि मत दिसून येतें. हस्तलिखितांवरून नक्कल करीत असतां पुष्कळदां त्यांत कमीअधिक झालेलें आढळून येतें; परंतु सबळ पुराव्यावाचून ग्रंथाचा कोणताहि भाग गाळून टाकतां येत नाहीं. हाच मार्ग प्रा. कुळकर्णी आणि श्री. बोबडे यांनीं स्वीकारला आहे. गुरुमाहात्म्यकथनाचे १८ वें प्रकरण विवेकसिंधूच्या अत्यंत सरस प्रकरणांपैकीं एक आहे. त्या प्रकरणाच्या शेवटी आलेल्या १३७ ते १४१ या ओव्या लक्षांत घेण्यासारख्या आहेत. त्यांचा उतारा वर दिलाच आहे. लिहिणार सुरेंद्रभारती । संमत् १२४४ प्रती । यांतील सुरेंद्रभारती हें नांव महत्त्वाचें आहे. पुनः याच प्रकरणामध्यें 'सुरेंद्रभारती मुख्य । हरीनें बोधिले शिष्य । परिक्वपा असंख्य । फळली रामचंद्रीं ( १८-१०२ )' असा त्याच नांवाचा निर्देश आहे. श्री. बोबडे यांनीं पान ३८ वर एक वंशावळ दिली आहे त्यांत (१) चैतन्येश्वर (आदीनाथ), त्यांचे शिष्य (२) हरिनाथ त्यांचे दोन शिष्य (१) सुरेंद्रभारती (२) रघुनाथ, व रघुनाथाचे शिष्य मुकुंदराज, अशी परंपरा आहे. सुरेंद्रभारतीनें वैनगंगेच्या तीरीं अंबनगरींत ( अंभोरें येथें ) गुरूसमोर विवेकसिंधु हा ग्रंथ लिहिला. सुरेंद्रभारती हें शिष्यावली मधील एका शिष्याचें नांव आहे असें प्रा. कुलकर्णी म्हणतात. शके १११० मध्यें साधारणनाम संवत्सरीं मुकुंदराजांनीं ग्रंथ निर्माण केला इत्यादि ग्रंथकार, ग्रंथलेखक त्या ग्रंथाचा उतारा करणारा कृष्णभट, ही महत्त्वाची माहिती देणाऱ्या या ओंव्या ग्रंथाचे अगदी शेवटीं असल्या तरी श्री. बोबडे यांस विवेकसिंधूच्या फार जुन्या प्रतीमध्यें मिळाल्या असल्यामुळें आणि सुरेंद्रभारतीच्या निर्देशामुळें, खास उपेक्षणीय नाहींत. त्यांस परंपरेचा मोठा आधार आहे. विवेकसिंधूचें लेखन शके १११० मध्यें आणि त्याचा उतारा शके ११२२ मध्यें म्हणजे केवळ १२ वर्षांनीं झाला ही माहिती अगदी नवीन आहे. श्री बोबडे यांच्या अखंड परिश्रमांचें ते फल आहे.

वर उद्धृत केलेल्या ओंव्यांत, शके १११० होत्तर साधारणनाम संवत्सर । असा शक संवत्सराचा निर्देश आहे. शालिवाहन शक आणि विक्रम संवत् यांचा मेळ घालण्याची शास्त्रीय पद्धति श्री. बोबडे यांनी आपल्या निवेदनांत दिली आहे. त्याचें स्पष्टीकरणहि केलें आहे. उज्जयिनी येथें विक्रमसंवत् चालू झाला. पुढें १३४ वर्षांनी पैठण येथें शालिवाहनानें आपला शक चालू केला. शालिवाहन शकाच्या अंकाबरोबर विक्रम संवताचें नांव घालण्याची पद्धती महाविदर्भामध्यें चालू होती. आतां शके १११० मध्यें साधारण संवत्सर येत नाहीं ही अडचण राहू नये श्री. बोबडे यांचें याविषयींचें संशोधन पूर्वीच झालेलें आहे तें आतां त्यांच्या निवेदनांत स्थिरपद झालें ही वाचकांची मोठी सोय झाली. श्रीयुत ढोक यांचेंहि मत तसेंच आहे. नामदार अणे यांनींहि या गोष्टीचा पुरस्कार केला आहे.

विवेकसिंधूच्या या नूतन मुद्रणाचा आणखी एक विशेष म्हणजे प्रा. डोळके यांनीं लिहिलेली उद्बोधक आणि विद्वत्ताप्रचुर प्रस्तावना. ही अभ्यासकाला मार्गदर्शक होणारी आहे. श्रीयुत बोबडे यांच्या व्यासंगाविषयीं त्यांस मोठा आदर आहे आणि तो सर्वथा उचित आहे. परंतु विवेकसिंधूच्या निर्मितीनंतर केवळ

१२ वर्षांनी ( शके ११२२ मध्यें ) लिहिण्यांत आलेल्या विवेकसिंधूच्या हस्तलिखितावरून आपण नकल करून घेतली असें जेव्हां बावाजी म्हणतात, त्यावेळीं संशोधकीय बुद्धिप्रामाण्याची कसोटी लावण्यास प्रा. डोळके तत्पर राहतात. त्यांना मिळालेली पोथी ही, शके ११२२ मध्यें लिहिण्यांत आलेल्या हस्तलिखितावरून कालान्तरानें नकललेली प्रत मात्र असूं शकते. ' असें तें म्हणतात. आपल्या विवेचक प्रस्तावनेंत मुकुंदराजांविषयीं स्थलकालविषयक जे निष्कर्ष मांडले आहेत ते सर्वमान्य होणारे आहेत किंबहुना अधिकारी माणसांनी त्यांना मान्यता दिली आहे. ' वैण्येगंगेच्या तीरीं । मणोहर अंबाणगरी । तेथ प्रगटले श्रीहरि । जगदीश्वरू ।। वि. सिं. उत्तरार्ध ११–३७।' या ओळीवर आधारलेल्या साधार प्रमेयामुळें मुकुंदराज आंभोऱ्याकडचे कीं आंबेजोगाईचे हा वाद आतां अधिक चालविण्याचें प्रायः प्रयोजन नाहीं. नागपूर प्रांतांतील वैनगंगेच्या तीरीं श्रीहरी जगदीश्वरु प्रकट झाले, तेथेच अंभोऱ्याला चैतन्येश्वर शिवलिंगाची स्थापना झाली. त्यांची व शिष्य श्रीरघुनाथाची समाधि अंभोऱ्यालाच आहे, अंभोरें येथेंच विवेकसिंधूची निर्मिति झाली, खेंडला येथें किल्ल्याच्या पायथ्याशीं मुकुंदराजांची समाधि आहे इत्यादि सर्व माहिती वाचकांस पटणारी अशी आहे. या प्रस्तावनेवरून या ग्रंथाचें आद्यत्व पुरेसें दिसून येईल.

श्रीयुत बोबडे यांनी जुनीं हस्तलिखितें मिळविण्यासाठीं केलेला दीर्घोद्योग आणि प्रा. डोळके यांची मौलिक प्रस्तावना हा प्रस्तुत ग्रंथाच्या बाबतींत समसमांचा सुयोग आहे. ग्रंथाच्या अंतरंगाविषयीं श्री. बोबडे यांचे श्रम मोजतां येण्यासारखे नाहींत तरीहि बाह्यांगाविषयीं एक साधी गोष्ट खटकते. ग्रंथाचा टाईप चांगला सुबोध आहे. परंतु पुष्कळ ठिकाणीं एकत्र येणाऱ्या शब्दाक्षरांचे अर्थशून्य खंड पडले आहेत, त्यामुळें वाचकाच्या मनांत विसंवाद उत्पन्न होतो. समस्त शब्दांमध्यें आडवी रेघ असल्यास वाचन सुकर होतें. परंतु अशा रेघा कोठेंच दिल्या नाहींत. निदान समस्त शब्दास माथ्यावर एकच रेघ देणें आवश्यक असतें.

शुन्य वादियाचे मत तेजघन्य । या शब्दपंक्तीचा अर्थ कसा लक्ष्यांत यावा ? येथें मुद्रण असें पाहिजेः— शुन्न वादियाचें मत तें जघन्य । पृ. १७ अशींच आणखी कांहीं स्थळेंः— भेटे निराकार निर अवयव । परब्रह्मजे । अघट मान; पृ. १९ जाय नि रसूनी ( पृ. ७ ); परी अनुभवाचें अवतरण । ते नवचेचकी । पृ. ९; न घे पीजे ( पृ. ८ ) प्रकृति. चेनी दृश्य पणें; ( पृ. ४ ) गुणक्षो भिणी इ. ( पृ. २१ ) ; या शब्दपंक्ति वाचणें अशक्य आहे असें नाहीं परंतु वाचक अडखळतो. शुद्धिपत्राचा पदोपदीं उपयोग करणें तितकेंच कठीण.

कदाचित् मूळ हस्तलिखितांतहि हे दोष असतील. परंतु जेथें पाठभेदाचा किंवा पाठचिकित्सेचा प्रश्न नाही त्याठिकाणीं शब्दांची जुळणी योग्य ती करणेंच आवश्यक होय. हें कार्य एखाद्या जाणत्या माणसाचें सहकार्य घेतल्यानें झालें असतें. अर्थग्रहणाला त्याची इष्टता मोठी आहे.

कांहीं झालें तरी ही उणीव केवळ बाह्यांगविषयक आहे. त्यामुळें श्री. बोबडे यांनी जुनें हस्तलिखित मिळविण्याकरितां केलेले परिश्रम, मुकुंदराजाचें स्थल आणि विवेकसिंधू लेखनाचा काल याविषयींचे कूट प्रश्न सोडविण्याची खटपट, शक संवत्सरांचा मेळ घालण्याची रीति, मुकुंदराजांच्या गुरूचें उपनांव बोबडे आणि बोबडे घराण्याची वंशावळ मिळविण्याचा साक्षेप, हें सर्व पाहून त्यांना ग्रंथ संपादनकार्याबद्दल धन्यवाद द्यावे तितके थोडे ! श्री. हरिनाथांचे शिष्य आणि मुकुंदराजाचे गुरु रघुनाथ हे बोबडे घराण्यांतील असल्यामुळें मुकुंदराजांना, त्याचप्रमाणें श्री. बावाजी यांना, बोबडे या शब्दाविषयीं आत्मीयता वाटणें साहजिक आहे विवेकसिंधूतील पुढील शब्दयोजना साभिप्राय असेल काय असा विचार मनांत येतो. या बोबडिया बोला । श्रीचंद्रचूड संतोषला (प्र. १–११); आतां असो हे बोबडा बोलीं । म्यां जे गुरुस्तुति केली । ( प्र. १८–१२४ ) ; मज चतुर्दशी न जोडे । म्हणोनि बोललों बोबडे । जैसे उस वाकुड । अति रसाळ ।। ( प्र. १८–१२५ ). अर्थात् या शब्दश्लेषाविषयीं आग्रह नाहीं !

—प्रा. य. र. आगाशे



अनुक्रमणिका









मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास


अमृतमहोत्सवी

Regd. No. B. 5177








[अनुक्रमणिका](#)

